


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका



जुलै १९६८ • वर्ष २४ वे • मूल्य १॥ रु.

# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य—कला—विलास

## श्रे य ना मा व ली–

**स्वकुल तारक सुता**—बालगंधर्व यांना **हरिहर सीताराम उर्सेकर** यांच्या शब्दात स्मृत्यंजली • **शल्य**—स्वत:च ठरवून घेतलेले प्रायश्चित्त—**माधव सराफ** • **लाल दिवा**—नोकरी करणाऱ्या स्त्रीवर असा प्रसंग ओढवला तर?—**सौ. शैलजा राजे** • **आमच्या बंगल्यातला पहिला पावसाळा**—देसाईंचे घर नि 'ताज-महाल' यात श्रेष्ठ कोण?—**गं. का. भडकमकर** • **तवंग**—अशी माणसे लग्न तरी कशाला करतात? **प्रा. लक्ष्मीकांत तांबोळी** • **तपस्वी शिल्पकार**—पद्मश्री नानासाहेब करमरकर यांच्या कलेचा **मधुसूदन फाटक** यांनी घडविलेला परिचय • **एक झपाटलेला माणूस**—**कु. योगिनी जोगळेकर** यांच्या चष्म्यातून दिसलेले **श्री. चं. वि. बावडेकर** • **भैरवी**—या रागाला काळ—वेळेचे बंधन नाही —**सौ. यमुना शेवडे** • **मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध**—लेखाचा उत्तरार्ध—**डॉ. भ. ग. कुंटे** • **कलंदर**—बरेच आहात की असं तिला किती वेळा म्हणावं लागलं?—**भी. गो. जांबळे** शिवाय **इंद्रधनुष्य**—**ज्ञानेश्वर नाडकर्णी** • दीपमाला—**सारस्वत** ही नेहमीची वाचनीय सदरे आणि

### ★ मासिक व्यंगचित्रमाला ★

**'पडणे'....कोण कसे पडले ?**

Gram: Dalalart
टे. नं. ३५७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ - ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

★ संपादक—मुद्रक—प्रकाशक—मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०—४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु. + रजि. पोस्ट ८० पैसे वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.

अनुक्रमणिका



## दलाल आर्ट स्टुडिओ


४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६.

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे बटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# ग्रीष्म पेटला आहे ! शांतवाया येई वर्षे !!

**ग्रीष्म** पेटला आहे. जाळीत सुटला आहे. पेटवीत सुटला आहे. माणसे, घरेदारे, गायी गुरे, राष्ट्रीय एकात्मतेचे फतवे, निधर्मी सिद्धांतांवरच्या श्रद्धा, भारतनिष्ठा, शेजारधर्म, माणुसकी, इतिहासाचे लागेबांधे ह्या साऱ्यांना चूड लावीत तो फिरतो आहे. तो फक्त काश्मीरमध्येच मोकाट सुटलेला नाही, नागाप्रदेशातच धिंगाणा घालीत नाही, उत्तर प्रदेशातल्या एखाद्या गावातच त्याने मशाल पाजळली नाही तर ह्या आपल्या महाराष्ट्रात सुद्धा त्याने चूड पेटवली आणि अनेक निरपराध माणसांची हत्या घडविली. लाखांची मत्ता नष्ट केली. अनेकांना रस्त्यावर आणले आणि अनेकांना सदेह वैकुंठ दाखविला. मृत्यूचे, जाळपोळीचे, अब्रुहानीचे हे थैमान पाहून वाटले की, इतिहास अजून १९४७-मध्येच रेंगाळतो आहे. नौआखली अजून संपली नाही–शांत झाली नाही. देशविच्छेदन झाले नाही. हा देश 'इंडिया दॅट् इज भारत' ह्या नावाने जणु अस्तित्वात आलाच नाही. पाकिस्तान घडलेच नाही. १९४७ पूर्वीच्या 'अल्ला हो अकबर' व 'पाकिस्तान झिंदाबाद'च्या घोषणा 'दॅट् इज भारत'मध्ये होऊ कशा शकल्या असत्या? पण झाल्या. औरंगाबादेत झाल्या. महाराष्ट्रात झाल्या. शिवाजीचे पुतळे उभारण्यात सध्या दंग असलेल्या शासनाखाली हे घडले. एवढेच नव्हे तर पोलिस अधिकाऱ्यांना चोप देण्यात आला. आमदार व अन्य पक्षीय पुढाऱ्यांना मार देण्यात आला आणि तरीही शासन काहीसे गाफीलच होते. 'तामीर इ मिलात'च्या अधिवेशनात एका वक्त्याने फार स्फोटक अशी विधाने केली व शासन (केंद्र) नपुंसक असल्याचा शेरा मारला. शासनाने ही 'बालिश' बडबड मानली (असावी) म्हणून अखेर औरंगाबाद पेटले. 'रस्त्यावर या' हे आवाहन अक्षरशः पाळले गेले. शासन मात्र सचिवालयातल्या खोल्यात होते. हे जे घडत होते त्याची 'गंभीर' दखल घेतली गेली नाही. (असे दिसते).

ग्रीष्म पेटला आहे. आम्ही नागांना वचने देतो. चीन त्यांना शस्त्रे देते. शिक्षण देते. इकडे दिल्लीत बोलणी चालतात तिकडे गाड्या उडविल्या जातात. काही सुरक्षा सैनिक गारद होतात. चीनच्या सहाय्याने प्रस्थापित नागा सरकार उध्वस्त करण्याचे कट होतात. बोलणी होतच राहतात. बॉम्ब फुटतच स्फोट होत राहतात. नागालॅण्डमध्ये आणि इकडे पार्लमेण्टमध्येहि ! तेथेही चीन दावा साधीतच आहे. कारण 'भाई भाई'च्या घोषणातले स्वप्नरंजन अजून तिथे कायम आहे.

ग्रीष्म पेटला आहे. पुन्हा एकदा जातीय वाद ह्या शब्दाने आम्ही हैराण झालो आहोत. जातीय आणि राष्ट्रीय काय याचा अज्जून निकाल लागला नाही. शत्रू कोण, मित्र कोण हे ठरले नाही. कृतीनेच ते ठरत असते ह्यावर अजून आमची श्रद्धा बसत नाही. ह्या भूमीत माणसेही जन्मतात आणि सैतान, सर्प आणि हिंस्त्र श्वापदेही जन्म पावतात–पावू शकतात ह्यावर अजून आमचा विश्वास नाही. म्हणून इथे जन्मला तो आमचाच की, अशा अतार्किक सिद्धांताची मनोमन जपणुक आम्ही करीत बसलो आहोत–मग कधी सैतान मोकाट सुटतात आणि ही भूमी खायला उठतात. मूलगामी सिद्धान्त, मूलगामी चिंतनाला आम्ही भितो काय? की आमची दृष्टि स्वच्छ झाली नाही? इतिहासातून आम्ही काहीच शिकू शकत नाही काय? इतिहासाची 'पुस्तके' बदलून इतिहास बदलत नाहीत. गटारगंगेच्या खाली ठसठशित वा रंगीत अक्षरात 'गंगा' म्हटल्याने तिची दुर्गंधी लोप पावत नाही. सर्पाला 'नागराज' म्हणून माळा घातल्या वा दूध पाजले तरी तो विषाची कुपी टाकून देत नाही. रावणाला शंकरभक्त म्हटल्याने 'सीताहरण' काही नाहीसे होत नाही. किती दिवस आम्ही सत्याला भिऊन पळणार आहोत? पेटत्या ग्रीष्माच्या दाहक प्रकाशात अजूनही सत्य स्वच्छ शब्दात दिसून येत नाही? की सत्तेच्या कैफाने आमची दृष्टी क्षीण झाली आहे? पण सत्य नाकारता येणार नाही. सत्याधिष्ठित राज्य टिकवायचे असेल तर सत्य स्वीकारावे लागेल. ते नाकारू तोवर ग्रीष्म जाळीतच राहील. जाळणे हा तर त्याचा धर्म आहे.

पण आम्हाला ग्रीष्म नको आहे. वर्षा हवी आहे. पेटलेल्या आगी विझविणारी वर्षा! सृष्टीला शांत, तृप्त, समृद्ध करणारी वर्षा हवी आहे. हे राज्य त्यातुन जगेल. स्थिरावेल. येणाऱ्या सरी साठवून ठेवा. तीच खरी जीवनशक्ति आहे. तीच खरी प्रेरणा आहे. ग्रीष्म हा तिचा स्वभाव नाही. शांति, पुष्टि, तुष्टि हा तिचा स्वभाव आहे.

म्हणूनच 'शांतवाया येई वर्षे' असे आम्ही आवाहन करतो. –संपादक




अनुक्रमणिका

गंधर्वांचे आठवावे रुप । गंधर्वांचा आठवावा अभिनय ।
गंधर्वांचे स्मरावे संगीत । भूमंडळी ।

अश्रद्ध महाराष्ट्राने अखंड श्रद्धेने दोनच दैवते पूजिली. एक बाल गंगाधर व दुसरे बालगंधर्व. १९०५ ते १९५५ या पन्नास वर्षांचे कालखंडात—पारतंत्र्याच्या तसेच स्वातंत्र्याच्या काळातहि—बालगंधर्वांनी नाटचरसिकांच्या भावविश्वावर साम्राज्य केले. शिवछत्रपती किंवा सम्राट नेपोलियन यांच्यापेक्षाहि याबाबतीत बालगंधर्व अधिक भाग्यवान !

# स्वकुल तारक सुता......



खरोखर नटसम्राट होते ते. रसिकहृदये ही या सम्राटाची राज्यभूमी. दिपले नरेश लागेल दृष्ट असे अलौकिक स्वरुप, मधुमधुरा मोहना गिरा, असामान्य अभिनयपटुत्व आणि रसिक मनाला हुरहूर लावणारे स्वर्गीय गायन ही या नाटचगानकला-निपुण बादशहाचीच चतुरंग सेना ! गंधर्व नाटक मंडळी हे त्यांचे सचिवालय आणि रंगभूमी ही युद्धभूमी !

लोभस लावण्य, गोड वाणी, मधुर गायन किंवा जीवघेणा अभिनय या हरएक गुणात त्यांचेपेक्षा उजवा नट कुणी झालाच नाही असा त्यांच्या सम्राटपदाचा अर्थ नाही. तर या सर्व गुणांचा परमोच्च संगम जर कुणा एका व्यक्तीत झाला असेल तर तो बालगंधर्व किंवा नारायणराव राजहंस यांच्यातच.

राजांचा जन्म केवळ राजांपासून होत नसून पराक्रमापासून होत असतो हे श्रीकृष्णाच्या तोंडचे तेजस्वी उद्‌गार बालगंधर्वांच्या बाबतीत सर्वार्थाने खरे आहेत. एका गरीब मध्यमवर्गीय कुटुंबातला त्यांचा जन्म; पण अश्वमेध करणाऱ्या विजिगिषु राजाप्रमाणे त्यांनी आपल्या कलेचा वारू मुक्त सोडला व रंगभूमीवर अजिंक्यपद मिळविले. आय्. सी. एस्. मंडळींनी व राजेरजवाड्यांनी त्यांची मैत्री संपादन करण्यात आनंद मानला. कोल्हापुरात मुक्काम असताना श्री छत्रपतींच्या वाड्यावरून वाढलेले सोन्याचे ताट रोज या नटसम्राटाला जात असे.

या महान कलावंताचे कलासाम्राज्य सर्वार्थाने निधर्मी व भाषातीत होते. सर्वधर्मीय व विविध भाषीय प्रेक्षक त्यांच्या नाटकाना गर्दी करीत. एक गुजराती गायनप्रेमी शेठ होते. त्यांनी मुंबईत कंपनी असताना एकही खेळ चुकविला नाही. मराठी भाषेत त्याना विशेष रस नसे, पण 'अरे ते गंधर्वाचे गायनवर आमी जान छोडते' असे म्हणत. ते नाटक ऐकायचे. 'स्वयंवरा'तील 'नृपकन्या' झाले किंवा 'एकच प्याला'तील 'प्रभु अजि गमला' ही भैरवी आटोपली की त्यानी घराकडे गमन केलेच. दाक्षिणात्य नटश्रेष्ठ

शिवाजी गणेशन् हे गंधर्वांना अभिनयाच्या बाबतीत गुरु मानतात. कंपनीचे प्रयोग हुबळीपासून नागपूरपर्यंत कुठेहि असोत हाऊसफुल्ल व प्रफुल्ल ! कंपनीचे व्यवस्थापक बालगंधर्वांचे बंधु बापुराव यांचा वेळ निराश प्रेक्षकांना' 'तिकिटे संपली' हे सांगण्यातच अधिक खर्च होई. काय करणार देवा !

नटाच्या सौंदर्याची जात 'पानी तेरा रंग कैसा' या स्वरूपाची असावी. कुठलीहि भूमिका असो, त्या भूमिकेचे सौंदर्य वाढविणारे रूप नटाजवळ अवश्य हवे. गोल चंद्रमुखी चेहरा, टपोरे विलोल लोचन, सुबक हनुवटी, बांधेसूद बायकी बांधा, हातांचा गोंडसपणा असे निसर्गदत्त लावण्य. लाखो बायकात अशी देखणी ही रुपखनी रंगभूमीवर 'दादा ते आले ना' असे म्हणत पायऱ्या उतरीत प्रवेश करताच प्रत्यक्ष रुक्मिणीच कुंडीनपुरातील महालात पुन्हा प्रकटली आहे असे वाटायचे. या राजबिंड्या नटाला फाटके लुगडे नेसवून मी रसिकांच्या मनाला पाझर फोडीन अशा जिद्दीने गडकऱ्यांनी 'एकच प्याला' लिहिले. त्यातील वकिलाच्या तरुण पत्नीची भूमिकाहि नारायणरावांच्या रूपाने उजळून गेली. 'अंगे भरली जलधारांनी' या पावसाच्या दृश्यात 'वसंतसेना' म्हणजे बालगंधर्व हे पुरुष आहेत हे विसरून प्रेक्षक त्यांच्यावर दुर्बिणी रोखीत ! केवढी ही नट व प्रेक्षक यांच्यातील समरसता ! सत्यसृष्टी आणि

## हरिहर सीताराम उर्सेकर

सत्याभास यांच्यातील सीमारेषा 'जिथे सागरा धरणी मिळते' अशा जेव्हा बेमालूम मिसळतात तेव्हाच कलेचा दिव्य साक्षात्कार घडत असतो. म्हणूनच वाटते की स्त्री-वेषात जाऊन हळदीकुंकू घेऊन परत आल्याची या नटवरासंबंधीची कथा केवळ दंतकथा नसावी, कारण 'एकला नयनाला विषय तो जाहला' असेच त्यांचे रूप होते.

बालगंधर्वांना आर्जवी आवाजाची लालित्यपूर्ण देणगी लाभली होती. गोड गळा पुष्कळांचा असतो, गद्यमधुर आवाजहि अनेकदा आढळतो. पण वाक् अर्थाप्रमाणे या दोन्ही गुणांचा एकत्र योग मात्र क्वचितच ! "या नंदकुमारांचे बोलणं, वागणं, चालणं, पहाणं सगळं सगळं कसं मनाला वेड लावणारं आहे"–हे रुक्मिणीचे वाक्य गंधर्वांना तंतोतंत लागू पडते. शब्दोच्चार स्पष्ट, त्यात भावनाकुल चढउतार. स्मृती तीव्र, त्यामुळे अचूक नक्कल पाठ असायची, व वाणीतील गोडव्याला सहजतेची डूब मिळायची. गाण्यातील शब्दांप्रमाणे गद्य शब्दांचीही पुनरुक्ती करण्याची त्यांची लकब परिणामकारक ठरे. "मी साफ सांगते येणार नाही, हो हो, मी साफ सांगते येणार नाही" ही भामिनीची वाक्ये उदाहरण म्हणून सांगता येतील.

गायनाप्रमाणे त्यांच्या गद्य वाक्य उच्चारण्यातहि लयबद्धता (रिदम्) जाणवत असे. 'खडा मारायचा झाला तर' हे रुक्मिणीचे शृंगारिक स्वगत घ्या, 'मी दासी नाही' हे तेजस्विनी द्रौपदीचे



उद्‌गार ऐका किंवा 'आपण बायकांनी असं बोलू नये गीताबाई" हे सिंधूचे करुणरम्य शब्द आठवा. रसपरिपोषक परिणामकारकता हा त्यांच्या वाणीचा अविस्मरणीय विशेष होय. रसपरिपोषामुळेच कोणतीहि भूमिका समृद्ध होत असते.

लवचिक वाणीबरोबरच या नटराजाजवळ अभिजात अभिनय-कौशल्य होते. भूमिकेशी तद्रूपता हा या गुणवंताचा विशेष होता. लतावेलींना पाणी घालणारी शकुंतला असो वा धुणी वाळत घालणारी इंदिराकाकू, भूमिकेशी तादात्म्य हेच त्यांच्या नाट्य-जीवनाच्या यशाचे रहस्य. वटवृक्षाला प्रदक्षिणा घालताना सत्य-वानाकडे चोरून पहाणारी सावित्री किंवा "खरंच इकडे दारू सोडणं झालं" असे म्हणणारी सिंधु, नायिका कुणी असो, तीच उत्कट एकरूपता !

नरम नारायणराव गरम कसे होत हे द्रौपदी नाटकाच्या दिवशी पहावे. सकाळपासून मामला तापत असे. मग रात्री स्वाभिमानी पांडव सम्राज्ञीची भूमिका कां रंगणार नाही. याउलट कान्होपात्राने चोखोबांना 'मला शिकवाना अभंग' असे म्हणताना त्यांच्या मुखावर निर्व्याज बालकाचा सात्विक भाव दिसे.

***गळा गेला पण सूर मागे राहिला, जीवनपुष्प कोमेजले तरी स्मृति-सुगंध दरवळतोच आहे, अशा महाराष्ट्र-रसिकांच्या लाडक्या बालगंधर्वांचे स्मारक म्हणून महाराष्ट्रात 'बालगंधर्व अकादमी' निघाली पाहिजे आणि त्या अकादमीतून होतकरू नटांना नाट्य-नृत्य-संगीताचे सशास्त्र शिक्षण पाहिजे, ही मराठी जनतेची मागणी--***





अनुक्रमणिका

मुखाभिनयाच्या जोडीने त्यांच्या जवळ अंगाभिनयहि उच्च दर्जाचा होता. उभे रहाण्याचा त्यांचा पवित्रा क्रिकेटपटूच्या स्टान्सप्रमाणे सचित्र प्रसिद्ध होत असे.

बालगंधर्व एका व्याख्यानात म्हणाले की 'संगीत म्हणजे सूर, ताल व रस यांची एकरुपता'. जवारीदार मधुर आवाज, गळ्यात लडिवाळ लटक, शब्दांचा अर्थपूर्ण उच्चार आणि लयकारीचे रसानुकुल गाणे त्यांच्या ठिकाणी एकवटले होते. ज्ञानेश्वरांची जशी शब्दांवर हुकमत तसे सूर नारायणरावांचे भरी पाणी भरीत. बारा सुरांच्या राशीचक्राचा स्वामी म्हणजे हा सूर्य-नारायण !

त्यांचे गायन रसपरिपोषक होते. 'गान-साभिनय असा न दुसरा' असे ह्यांचे वर्णन माधव ज्युलियनांनी केलेले आहे. 'नाही मी बोलत नाथा' या पदातील लाडिक शृंगार, 'दया छाया घे' यातील असीम कारुण्य, किवा कान्होपात्रा वा मीराबाईचे पदातील भक्तिरस असो, कुठल्याही रसाची वृद्धी ते आपल्या गायनाने करीत.

नवरस हे या नटसम्राटाचे नवदल होते. कालीदासाप्रमाणे ते केवळ शृंगारैकरस किवा भवभूतीसारखे 'कारुण्यमेव तनुते,' असे नव्हते. रससिद्धान्त आधुनिक न-नाटयाला लागू पडो वा न पडो, पण पारंपारिक अभिजात नाटकांच्या यशाचे रहस्य मात्र रसपोषणात आहे. प्रेक्षक मनोरंजनासाठी नाटकाला जातो. जीवनातील विविध रस नटांच्या द्वारा पेले भरभरून प्रेक्षकांना देण्यानेच हे रसिकरंजनाचे कार्य घडत असते. (रसं) पीयते अनेन इति पात्रम्। म्हणूनच नटाला पात्र म्हणतात. रसनिर्मिती करण्यात संगीताची फार मदत होते हे ओळखूनच बालगधर्वांनी गंधर्व संगीत मंडळी काढली.

शृंगारराजा हा नटसम्राटांचा सर्वश्रेष्ठ मांडलीक. भ्रमरांना न दुखविता फुले तोडणारी देवयानी असो, नरवर कृष्णासमान, 'मला मदन भासे' किंवा 'सजला नटला जणुं राजा' या शब्दांनी प्रियकराचे कौतुक करणारी रुक्मिणी, भामिनी किंवा सावित्री असो, बालगंधर्वांचा शृंगार हा पराक्रमावर आसक्त असलेल्या रमणीचा शृंगार आहे, त्यात संयम कधीच सुटायचा नाही. धैर्यधर—भामिनीचा पोशाखी-प्रवेश म्हणजे हृद्य संयमी शृंगाराचा वस्तुपाठच होय. 'बंधन योगे अमर संसार' हे खाडिलकरांचे तत्वज्ञान बालगंधर्वांनी कलेच्या संसारातहि आचरले होते.

उत्तररामचरित्रातील सीतेप्रमाणे एकच प्यालयातील सिंधु म्हणजे करुणरम्य मूर्ती अथवा शरीरिणी सिंधूची कारुण्यपूर्ण भूमिका बालगंधर्व अप्रतिम वठवीत. 'मज जन्म देई माता' या पदानंतर एक वकिलाची पत्नी, गीताबाईच्या — त्याच वकिलाच्या कारकुनाच्या स्त्रीच्या — पायावर कृतज्ञतेने डोके ठेवते तो प्रसंग हृदयद्रावक असे. १९३१ साली बालगंधर्वांची सर्वोत्कृष्ट भूमिका सिंधु होय असे २०५२ रसिकांनी रत्नाकर मासिकाच्या 'ओपिनीयन पोल'मधे मतदान केले. व रुक्मिणीला फक्त १३०१ मते मिळाली. यावरून या नटश्रेष्ठाच्या करुण भूमिकेलाच प्रेक्षकांनी अधिक दाद दिली हे सिद्ध होते.

नाटक हे केवळ मनोरंजनार्थ नाही. जीवनाचे उज्ज्वल आदर्श जनतेपुढे मांडणारे खाडिलकर—गडकऱ्यांनी रंगविलेले आदर्शोन्मुख—यथार्थवादी संसारचित्रच गंधर्वांनी रंगभूमीवर सादर केले. त्यांनी प्रेक्षकांसमोर ध्येय ठेवले ते चारित्र्यसंपन्न आर्य कुलकन्यांचे. पतिव्रता सिंधू-सावित्री, पितृभक्त रुक्मिणी, देवभक्त मीरा—कान्होपात्रा, प्रियकराशी एकनिष्ठ रहाणारी वारांगना रेवती+वसंतसेना, स्वाभिमानी द्रौपदी अशा अनेक बहुरंगी भूमिकांच्या द्वारा सुकन्याच गृहिणीपदाला चढत असतात हा उच्च स्त्री-जीवनाचा आलेख समाजासमोर त्यांनी ठेवला. 'नयनीति ही बहु प्रेमळा, मजधर्म हा समजाविला' हेच रमणीचे पुरुषाचे जीवनातील स्थान. स्त्रियांचा पोषाख आकर्षक जरूर असावा, पण छचोर नसावा हे त्यानी साभिनय सांगितले. बालगंधर्वांच्या केशभूषेची व वेशभूषेची नक्कल कुलकामिनी सुद्धा करीत असत, केवळ कॉलेज कन्यकाच नव्हे!

पद्मभूषण हा सरकारी किताब, मुंबई-पुण्यास 'बालगंधर्व रंगभवनें' ही त्यांची स्मृतिचिन्हे अपुरी आहेत. आज मराठी रंगभूमीला वैभवाचे दिवस पुन्हा दिसत आहेत. नवनवे नाटककार व नट पुढे येत आहेत. मराठी नाटयकलेच्या या पुनरुज्जीवनाच्या रीनेसाँच्या पुष्टीकरणार्थ सरकारने बालगंधर्व अकादमी मुंबईत काढावी. त्यात होतकरू नटांना नाट्य, नृत्य आणि संगीताचे सशास्त्र शिक्षण मिळाले पाहिजे.

गळा गेला पण सूर मागे राहिला. जीवनपुष्प कोमेजले तरी स्मृती-सुगंध दरवळणारच. देवलोकी गेलेल्या या देवाचे दर्शन पुन्हा होणे नाही. पण त्यांचे गायन मागे राहिले. त्यांच्या ध्वनिमुद्रिका रोज रेडिओवर लावून त्या स्वर्गीय संगीताचे सूर घराघरात ऐकू आले पाहिजेत. त्यांच्या आठवणीहि मराठी नाट्यपरिषदेने गोळा करून प्रसिद्ध कराव्या. जपानमध्ये सोळा वर्षाच्या युवतीचे काम करणाऱ्या सत्तर वर्षाच्या जपानी बालगंधर्वाचे किती कौतुक होते ते कळण्यासाठी शांता रमाराव यांचे 'ईस्ट ऑफ होम' हे पुस्तक पहावे.

जनतेने बालगंधर्वांवर अपरंपार, अखंड प्रेम केले. त्यांना मान दिला. ज्यांच्या पायावर डोके ठेवून कुलीन स्त्रियाहि नमस्कार करीत असा एकच नट माझ्या पहाण्यात आहे आणि तो म्हणजे बालगंधर्व. आपल्या आचरणाने नटाला व कलेने नाटकधंद्याला त्यांनी उच्च सामाजिक दर्जा प्राप्त करून दिला. खरोखर गंधर्वनाटक मंडळीचे युग म्हणजे मराठी रंगभूमीचे सुवर्णयुगच होय. ते आता संपले ! मधुघट रिकामे पडले ! मला वाटते 'नटानाम् बालगंधर्वो ऽस्मि" असे म्हणण्याचा मोह नटराज भगवंतालाहि आवरणार नाही ! ●

**पढणे—धन्य ती कळा**




आपल्याकडे कोणी पडेल काय ?




—माधव सराफ

**सिद्धीविनायकाचं** मंदिर दिसलं म्हणजे आपसूकच माझे पाय थबकतात. मंदिराच्या प्रांगणात प्रवेश केल्याविना मला करमत नाही. खरं म्हणजे, मी नास्तिक ! दगडाच्या मूर्तीसमोर लोटांगण घालणाऱ्या भक्ताची मला कीव येते. मी सिद्धीविनायकाच्या मूर्तीपाशी चुकूनदेखील जात नाही. कधीसुद्धा मी मूर्तीपुढे हात जोडले नाहीत. सिद्धीविनायकाच्या मंदिरात मी जातो ते देवदर्शना-साठी नव्हे. क्षणभर का होईना मला पाहायचं असतं मंदिराच्या आवारातील लंगडीला. सदान्‌कदा लंगडी पारू मोक्याची जागा धरून बसलेली असते. मला पाहून तिच्या डोळ्यात उल्हासाचं पाणी लखलखतं, सकाळी नवाच्या टिपणाला उन्ह झणकल्यासारखं. पाठला भाऊ भेटल्याप्रमाणं ती माझ्या नुसत्या दर्शनानं सुखावते. तिच्या टोकरीत मी कधी दहाची नोट अलगद ठेवून देतो, कधी पांचाची नोट घालतो. मंदिराच्या गडग्यावर दुटांगी धोतर पेहनलेले अन् दुबोटी गंध लावलेले म्हातारेबुवा बसलेले असतात. त्यांच्या दोन्ही अंगाला डोक्याची चांदी झालेले पेन्शनर आसनमांडी घालून बसलेले असतात. त्यांच्या गप्पात आयुष्यातील सुखदु:खांची वजाबाकी चाललेली असते. मी त्यांच्या गप्पागोष्टीत कधीच रस घेत नाही. गडग्यावर थोडा वेळ बसून त्यांचा 'काव्यशास्त्रविनोद' ऐकण्याचा मला मोह होत नाही. मंदिराच्या आवारात पाऊल टाकताच ही मंडळी माझ्याकडे भुवया आखडून पाहतात. एकमेका-कडे पाहून नेत्रपल्लवी करतात. संध्याकाळचा हा रोजचा अनुभव माझ्या अंगवळणी पडला आहे.

मंदिराच्या गडग्याला बिलगून बसलेली लंगडी मला पाहून ढुंगण खुरडत खुरडत मी थबकलेल्या जागी येते. तिच्या बुडाखालचं टायरचं काळंभोर रबर करकरतं तेव्हा माझ्या काळजात कळ उठते. चष्म्याची भिंगं ओलावतात. गुडघ्याखाली मुडपलेला डावा पाय थिटा झालेला पाहून मी हळहळतो. तिची माझी भेट फार तर दोन-तीन मिनिटांची असते. माझ्या हातातील नोट टोकरीत पडताक्षणीच माझ्या पायाला हात लावून ती भरपेट आशीर्वाद देते. त्यावेळी तिच्या डोळ्याची पाती



लवलवतात. मी मात्र बेचैन होतो. पारूच्या अवतीभवती दुसरे भिकारी दिसतात. लुळेपांगळे, आंधळे नि दुंडे. पण माझं लक्ष त्यांच्यावर अजिबात नसते. मंदिर सोडताना माझी अवस्था कळावे घातलेल्या गाढवासारखी होते. गडग्यावर बसलेल्या पेन्शनर मंडळींनी मला एका परीने गाढवच ठरविले होते म्हणा !

मंदिरात प्रवेशून पारूला 'दान' करण्याचा माझा हा नित्यक्रम सलग दोन महिनेतरी अव्याहतपणे चालला होता. गडग्यावरील दुटांगी धोतर नेसणाऱ्या म्हातारेबुवांनी एकदोनदा हटकून माझ्याशी दोस्ती करण्याचा प्रयत्न करून पाहिला. चेहऱ्यावर स्मित हास्य वागवून त्यांनी माझी ओळख करून घेतली. त्यांचे समवयस्क सोबती त्यांना 'तात्या' म्हणून संबोधायचे. प्राथमिक शाळेतील शिक्षकाची नोकरी इमानेइतबारे करून निवृत्त झाल्याचे त्यांच्याकडूनच समजले. तात्या खूप गोष्टीवेल्हाळ वाटले. माझ्या

ओळखीची सीमारेषा उल्लंघून माझी दोस्ती करण्याचा त्याचा प्रयत्न तिरसटपणे वागून मी उधळून लावला. लंगडीवरचे माझे मुलखावेगळे प्रेम पाहून पंतोजी दुग्ध्यात पडले होते. माझ्या दानशूर वृत्तीची त्यांनी तोंड भरून स्तुती केली होती. पण मी त्यांच्याशी तुसडेपणाने वागत असल्याने तात्या आताशा माझ्याशी फारसे बोलण्याचे टाळत होते.

आज मला वर्कशॉपमध्ये एका वडया शेठचे काम मिळाले होते. वर्कशॉपच्या मॅनेजरने ॲम्बॅसडर कारचे सर्व्हिसींगचे काम माझ्यासारख्या शिकाऊ मेकॅनीकवर सोपविले होते. ही कामगिरी सहा-सात तासात संपण्याजोगी होती. त्यासाठी मला अंग मोडून काम करणे मात्र जरुरीचे होते. त्याबद्दल मला मेहनताना म्हणून तीस रुपये मिळणार होते. मला पारूला आज दहा पंधरा रुपये देणे सहज शक्य होते. लंगडीला दहा रुपायाऐवजी तेवढयाच किंमतीचे एक लुगडे अन् शिवाय पाच रुपये देण्याचा विचार करून मी माझ्या कामात मश्गुल झालो. पुढे कधीतरी चांगली कमाई मिळण्याचा मोका साधून पारूला मी कुबडया खरेदून देणार होतो. कुबडयाच्या आधाराने का होईना ती चालल्याचे मला पहायचे होते. ॲम्बॅसडर कार खोलून मी माझ्या कामगिरीस लागलो नि बोल बोल म्हणता सहा तास लोटले. सर्व्हिसींगचे काम उरकले. वर्कशॉपच्या मॅनेजरने आपखुषीने तीस रुपये माझ्या हातावर ठेवले. कॅंटीनमध्ये स्पेशल चहा ढोसून मी तडक दादरचे कापड दुकान गाठले. गव्हाळचा रंगाच्या पारूला शोभेलसे टोपपदरी मोरपंखी लुगडे निवडले नि सिद्धीविनायकाच्या मंदिराच्या दिशेने मी मार्गस्थ झालो.

मंदिर दिसताच पिशवीतून मी लुगडयाची घडी काढली. पर्समधून पाच रुपायाची नोट काढली. आवारात पाऊल टाकताच, माझे पाय नित्याच्या जागी थबकले. नेहमीप्रमाणे गडग्यावर पेन्शनर मंडळी गप्पासप्पात चूर होती. त्या मोक्याच्या जागी माझी नजर भिरभिरली. अमळशाने एकजात भिकारी मी निरखू लागलो. आज भिकारी तुरळक दिसत होते. पारूचा कोठेच पत्ता नव्हता. ती भेटली नाही असे आजवर चुकूनदेखील झाले नव्हते. गडग्याचा आधार घेऊन मी तेथेच लंगडीची वाट पाहात उभा राहिलो. तेथेच शतपावली घालत राहिलो. तात्यानी मला हटकले नि गडग्यावर आपल्यापाशी मला बसवून घेतले. माझ्या मनाची चलबिचल ओळखून ते मला म्हणाले,

"काय कोण जाणे आज लंगडीचा पत्ता नाही बुवा. आम्ही इथं दोन तास बसलो आहोत. . . असं कधी झालं नव्हतं. . . आल्यासारखं बसा पाचदहा मिनिटं. . . . . . ."

मी काहीच बोललो नाही. लुगडयाची घडी पिशवीत लपवीत मी मांडया हलवीत गडग्यावर बसलो.

"अहो आज इथले बरेचसे भिकारी कोठे गडप झालेले दिसतात. महालक्ष्मीच्या देवळात उत्सव आहे ना आज ? तिथं गेले असणार. . . . ." दुसरा पेन्शनर म्हणाला.

"त्या लंगडीबद्दलची माहिती त्या कोपऱ्यातल्या दुंडया भिकाऱ्याला असते बघा. . . त्याला विचारून तरी पहा" माझ्याकडे वळून तात्या म्हणाले. लागलीच मी त्या दुंडयापाशी गेलो. मला पाहताक्षणीच माझ्या पायाला हात लावून तो ओरडला.

"तुमची लंगडी पारू जळून मेली. महालक्ष्मीच्या झोपडपट्टीला रात्री आग लागली नव्हं का? जीव वांचवायची लय खटपट केली समद्यांनी. पर पांगळं मानूस! आधाराबिगर बिचारीला खोपीतनं जलदीनं सटकायला गावलं न्हाई. . . . ."

माझ्या काळजात लक् झालं. चष्मा काढून मी डोळे पुसले. सुंद मनाने मी तात्यांच्याजवळ गडग्यावर बसलो.

"फार वाईट गोष्ट झाली. अपघाती मृत्यु वाईटच. . . पण काय हो, राग मानत नसाल तरच विचारतो, तुमची ती कोण लागायची?" तात्यानी सवाल केला.

"माझी कोणीदेखील नव्हती. ना रक्तामासाचं नातं ना जोडलेलं! पण पारूला भिकारी मात्र मीच बनविलं !"

"आँ ऽऽऽ" तात्यानी 'आ' वासला.

"ती एक माझ्या भेकडपणाची कहाणी आहे. अन् त्या कहाणीशी पारूचा लागाबांधा आहे. त्या शरमेनं आजवर तुमच्याशी फटकून वागत आलो. पारु लंगडी झाली ती माझ्यामुळं !"

"म्हणजे तुम्ही तिला कधी झोडपलं की काय ?" –दुसऱ्या पेन्शनरचा सवाल.

"छे, छे! माझ्या काळजाचा ठाव घेणारी ती एक कहाणी आहे."

"पण तुम्ही कसे जबाबदार म्हणता ?" तात्या माझ्या अगदी जवळ सरकत म्हणाले.

"ती छोटी कहाणीच सांगतो... घटना म्हणा हवं तर. . " असं मी म्हणताच त्या पेन्शनर मंडळींनी माझ्याभोवती कोंडाळे केले. कानात जीव आणून माझी कहाणी ते ऐकू लागले.

"वरळीच्या जॅकसन वर्कशॉपमध्ये मी मेकॅनीकचं काम करतो. रोजच्या कामानुसार मला मेहनताना मिळतो. दररोज किमान दहा रुपये कमाई होते. कधीमधी पंचवीस तीस रुपये रोजी मिळतात. तीन महिन्यांपूर्वीची घटना. एका सरदारजीची फटफटी दुरुस्तीसाठी माझ्याकडे मॅनेजरने सोपविली. फटफटी लगेच दुरुस्त करून हवी होती. त्याबद्दल मला पंचवीस रुपये मिळणार होते. अंग मोडून मी फटफटीमधील सर्व डीफेक्टस् काढून ती दुरुस्त केली. ट्रायल घ्यावं म्हणून संध्याकाळी सातच्या सुमाराला फटफटी बाहेर काढली. हेन्सरोडवरून मी फटफटी जोरानं चालवीत होतो. रस्त्याच्या बाजूला असलेल्या झोपडपट्टीतील एका झोपडीसमोर पारू पाय लांब सोडून बसली होती. अन् माझ्या फटफटीला काय झालं कोण जाणे ! हॅंडलवरील माझी पक्कड ढिली झाली नि फटफटीची आडदांड चाक तिच्या पायावरून गेली. . . अयाईऽऽऽ मेलेऽऽ. . . आर्त किंकाळी ऐकू आली. . . पकडो सालेकु. . . मारोऽऽ मारोऽऽ अशा आरोळ्या ऐकू आल्या तसा फटफटीचा वेग वाढवून मी जीव घेवून अक्षरशः पळून गेलो. . . माझ्या नशिबाने

[पृष्ठ ५८ वर पहा]







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





# लाल दिवा

विनीता....एक मोकळ्या मनाची विवाहित तरुणी. जगातल्या दुष्ट प्रवृत्तींशी तिचा परिचय नव्हता, माणसं दुष्ट असतात असं वाटतच नव्हतं. म्हणूनच जितेंद्रानं धोक्याचा लाल दिवा दाखवला तरीही तिनं त्या दुष्ट जाळ्यात पाऊल टाकलं आणि........

---सौ. शैलजा राजे

**जितेंद्रानं** ऑफिसमध्ये पाऊल टाकलं आणि आत शिरता शिरताच त्याची नजर मधल्या मोठ्या हॉलमध्ये भिरभिरली. विनीताचं टेबल रिकामं होतं. त्यानं समोरच्या घड्याळात पाहिलं. अकराला दहा मिनिटं कमी होती. म्हणजे विनीताची येण्याची वेळ होऊन गेली होती. कदाचित् ऑफिसचं घड्याळ पुढे असावं असंहि त्याच्या मनात आलं. त्यानं आपल्या मनगटी घड्याळाकडे नजर टाकली. त्यानंहि तीच वेळ जितेंद्राला दाखवली. जितेंद्र मनात थोडा नाराज झाला. हे असं अलिकडे वारंवार होत होतं. विनीता बऱ्याच उशीरा येत होती. जितेंद्राच्या हे लक्षात आलं होतं. पूर्वी कधीही विनीताला उशीर होत नव्हता. ऑफिसची वेळ टीक अकराची होती, परंतु विनीता बरोबर पावणे अकरालाच आपल्या जागेवर बसलेली दिसे. गेल्या वर्षात या गोष्टीत कधीही खंड पडलेला नव्हता. तिच्या येण्यावरून घड्याळ लावावं असं इतर लोक म्हणत होते. आणि याबद्दल विनीताला मोठा अभिमान वाटत असे.

परंतु मागच्या आठवड्यात जितेंद्र टूरवरून परत आला आणि त्याला दिसून आलं की, अलीकडे विनीता पूर्वीसारखी वेळेवर येत नाही. तिचं आपल्याशी बोलणंहि कमी झालेलं आहे आणि तिची मॅनेजरच्या खोलीकडे ये-जाही वाढलेली आहे.

हॉलमधून आपल्या केबिनपर्यन्तचा मधला कॉरिडॉर ओलांडून येईपर्यंत जितेंद्राच्या मनात अनेक विचार येऊन गेले. विनीताचे आणि त्याचे जे घनिष्ठ संबंध गेल्या वर्षभरात जडले होते, त्याची तो पुनः पुन्हा छाननी करीत होता. आज सकाळीही नास्ता करताना तो सुनेत्राला म्हणाला होता, "सुनू कळत नाही कां, पण अलीकडे विनीता बदलल्यासारखी वाटते."

"म्हणजे ?" सुनेत्रानं आश्चर्यानं विचारलं होतं.

परंतु म्हणजे काय हे नीटसं जितेंद्राला सांगता आलं नव्हतं. त्याचं त्यालाच नीटसं उमगत नव्हतं तर तो सुनेत्राला काय सांगणार ? सुनेत्रानं आपल्या पतीकडे एक हसरा कटाक्ष फेकला होता



अनुक्रमणिका

आणि ती म्हणाली होती, "तुम्ही किनई फार हळवे आहात. नाही तो विचार डोक्यात घेता आणि मनाला त्रास करून घेता. विनीताला अलीकडे फार काम असतं असं म्हणत होती ती परवा !"

"आली होती ती आपल्याकडे ? केव्हा ?" जितेंद्रानं विचारलं होतं.

"तुम्ही गेलात आणि दोन तीन दिवसानीच ती आली होती. सहजच ! तिच्या मुलाला कसलं तरी पुस्तक हवं होतं ते घ्यायला म्हणून बाहेर पडली होती. 'या बाजूला आल्ये म्हणून सहज डोकावले.' असं म्हणाली होती. त्याच वेळी बोलता बोलता कामाबद्दल बोलून गेली."

असं बोलत बोलतच सुनेत्रानं जितेंद्राला लंचबद्दल काही सूचना दिल्या होत्या आणि ती म्हणाली होती, "हे पहा आज मी मसाल्याची भरली वांगी करणार आहे. विनीताला माझ्या हातची भाजी फार आवडते, तिला आठवणीनं द्या वरं का !"

आणि आता केबिनमध्ये येऊन बसल्यावर त्याला हे सर्व आठवत होतं. त्यानं कामाची फाईल पुढ्यात ओढली, परंतु त्याचं लक्ष कामात लागत नव्हतं. आपल्या केबिनच्या दाराच्या खालच्या मोकळ्या जागेतून तो बाहेर नजर टाकीत होता. त्याच्या केबिनमधून बाहेर कुणी आलं तर त्याचे पाय जितेंद्राला सहज दिसत. कितीतरी वेळा विनीताच्या दिसणाऱ्या पावलांवरून तो ती दोन फूट दूर असतानाच म्हणत असे, "या ! आता काय काम काढलंय?"

यावर विनीता मोकळेपणानं खळखळून हसत म्हणे, "वा! म्हणजे काम असलं तरच यावं वाटतं आम्ही तुमच्याकडे."

तिचं ते मोकळं हसणं जितेंद्राला फार आवडत होतं. किंबहुना विनीताचा एकूण सर्वच मोकळा स्वभाव जितेंद्राला प्रिय होता. मोकळ्या स्वभावाची खळखळून हसणारी विनीता प्रथमदर्शनीच जितेंद्राला आवडली होती, आणि गेल्या वर्षभरात त्यांचा स्नेहही चांगला दृढ झाला होता.

जितेंद्राच्या ऑफिसमध्ये विनीता ही एवढी एकच स्त्री होती असं नाही. विनीताखेरीज आणखी सात एक तरुण देखण्या मुली त्याच्या ऑफिसमध्ये होत्या. त्या साऱ्या चांगल्याच मोकळ्या होत्या परंतु अबोल आणि कार्यमग्न जितेंद्राला कधीच कुणाविषयी काही वाटलं नव्हतं. कामाव्यतिरिक्त त्याचं कुणाशीच फारसं बोलणंही झालेलं नव्हतं. त्याला कुणाविषयी कसलीही जिज्ञासा वाटली नव्हती.

परंतु विनीताच्या बाबतीत काही निराळंच घडलं होतं. जितेंद्र ज्या फर्ममध्ये परचेस् ऑफिसर म्हणून नोकरीला होता ती फर्म तशी बरीच मोठी आणि नांवाजलेली होती. मोटारच्या स्पेअरपार्टस्चा फार मोठा व्यापार त्या फर्ममध्ये होत होता. त्या ठिकाणी अनेक तरुण मुली काम करीत होत्या. अस्खलित इंग्रजी बोलणाऱ्या ख्रिश्चन मुलींपासून ते आपल्या नवनव्या फॅशन्सचं प्रदर्शन करणाऱ्या सिंधी पोरींपर्यंत सर्व प्रकारच्या तरुण मुली तिथं होत्या. त्या सर्व जितेंद्राच्या रुबाबावर खूष होत्या. जितेंद्र देखणा होता, बुद्धिमान होता आणि एक व्यासंगी लेखकही होता. मराठी, हिंदी, गुजराती आणि इंग्लिश या सर्व भाषांवर त्याचं चांगलं प्रभुत्व होतं. त्याच्या व्यक्तिमत्वानं कुणीही आकर्षित व्हावं असंच ते होतं. विनीता ऑफिसमध्ये नोकरीसाठी आली होती, त्यावेळी तिची सर्व चाचणी परीक्षा जितेंद्रानं घेतलेली होती. विनीताचं विनम्र परंतु मोकळं बोलणं त्याला आवडलं होतं. एक 'स्मार्ट लेडी' एवढाच त्याच्या मनानं त्यावेळी निर्वाळा दिला होता. तिचं रूप कसं आहे, ती देखणी आहे की नुसती स्मार्ट आहे इकडे त्यावेळी त्याचं मुळीच लक्ष गेलं नव्हतं. त्याला विशेष जाणवला होता तो तिचा किनरा गोड आवाज आणि मोकळेपणानं बोलण्याची तिची ढब.

जितेंद्राच्या शिफारशीवरूनच विनीताची नेमणूक झालेली होती. विनीता आपल्या कामावर रुजू झाल्यानंतर साधारण आठ दिवसांनी मोहन जितेंद्राच्या केबिनमध्ये आला होता आणि त्याच्या पाठीवर एक थाप मारून म्हणाला होता, "वा ! वा ! जितेनसाहेब, अरे तू एवढा रसिक असशील अशी मला कल्पना नव्हती."

मोहनच्या बोलण्याचा अर्थबोध जितेंद्राला मुळीच झाला नव्हता. आपल्या भव्य कपाळाची एक शीर त्यानं उंचावली होती आणि डावी भिवई किंचित् वर उडवली होती. आपली रसिकता आजच मोहनला विशेषत्वानं कां जाणवली याचं त्याला कोडं पडलं होतं. त्याची ती गोंधळलेली चर्या पाहून मोहन मोठ्यानं हसला होता आणि म्हणाला होता, "अरे बाबा, तू आता जी लेडी सिलेक्ट केली आहेस, ती म्हणजे माल आहे माल. शिरीन, शोभा आणि मरलीन झक् मारताहेत तिच्यापुढे. आपण एकदम खूष आहोत तुझ्या सिलेक्शनवर !"

मोहनचं ते बोलणं ऐकून जितेंद्राच्या कपाळाला एकदम खूप आठ्या पडल्या होत्या. त्यानं आपलं डोकं फाईलमध्ये खुपसलं होतं आणि कामाला सुरुवात केली होती. जितेंद्रानं आपलं बोलणं उडवून लावलं हे मोहननं ओळखलं होतं आणि मग थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारून तो निघून गेला होता.

मोहन निघून गेला, त्या दिशेनं त्यानं एक नजर टाकली होती, आणि तिरस्कारानं, संतापानं त्यानं आपला ओठ चावला होता.

मोहन त्याचा बॉस होता. त्या सबंध फर्मचा तो मॅनेजर होता. ती फर्म काढली होती मोहनच्या चुलत्यानं आणि तेवढ्या वशिल्यावर मोहन त्या फर्मचा मॅनेजर बनला होता. तसाच विचार केला तर मोहन तसा दिलदार माणूस होता. पैशाच्या जोरावर त्यानं अनेक वेळा परदेशाचा दौरा केलेला होता, आणि त्यामुळे त्याच्या बोलण्या-चालण्यात एक आगळाच रुबाब निर्माण झालेला होता. आपलं बरचसं आयुष्य त्यानं मुशाफिरीतच घालवलेलं होतं, आणि त्यामुळे जीवनाकडे पाहण्याची त्याची दृष्टी एखाद्या खुशालचेंडूची होती. जीवन हे उपभोगाकरिताच आहे असा त्याचा दावा होता आणि सरळसाध्या धोपटमार्गी जितेंद्राला ते पटत नव्हतं. मोहनच्या सगळ्या गुणांवर या एका दुर्गुणामुळे पाणी पडलं आहे अशी त्याची भावना झालेली होती. आपल्याकडून होतील तेवढे प्रयत्न जितेंद्र करीत होता. मोहननं आपलं वागणं सुधारावं अशी त्याची

फार फार इच्छा होती. त्यासाठी जितेंद्र धडपडत होता, परंतु मोहनमध्ये तसूभरही फरक पडत नव्हता. तो होता तसाच होता. रोज एक नवं पांखरु धुंडाळीत होता आणि करता येईल ती चैन करीत होता.

मोहन निघून गेला होता आणि जितेंद्राचे विचार त्याच्या भोवती घोटाळत होते. जितेंद्रानं विनीता देसाईची निवड केली होती त्यावेळी तिच्या रूपाविषयी त्याच्या मनात कसलंही कुतूहल नव्हतं. तिची पदवी, तिचा अनुभव आणि तिच्या बोलण्यातलं सौजन्य त्याला आवडलेलं होतं. परंतु ती देखणी आहे हे त्याला आत्ताच मोहनच्या बोलण्यावरून समजत होतं. शोभा, शिरीन किंवा मरलीन यांची जशी गत झाली होती, तशीच आता विनीताची होणार होती. जितेंद्राला हे उमगलं होतं. आणि आपण आपल्याच हातानं एक सावज मोहनच्या जाळ्यात सापडून दिलं होतं याचा त्याच्या मनाला फार विषाद वाटला होता.

जितेंद्र या विचारात गढला होता आणि त्याच्या कानांवर फार मंजुळ आवाज आला होता. कुणीतरी केबिनचं दार धरून उभं होतं आणि म्हणत होतं, "येऊ का मी जरा आत ?"

जितेंद्रानं मान वर करून पाहिलं होतं. दारात विनीता उभी होती. जितेंद्रानं स्थिर नजरेनं तिच्याकडे पाहिलं होतं. मुद्दाम पाहिलं होतं. ती खरोखरच देखणी आहे किंवा काय हे तो न्याहाळीत होता. तिनं काळी चंद्रकळा नेसली होती. चंद्रकळेच्या काठांचा मरून रंगाचा ब्लाऊझ तिनं घातला होता. पांढऱ्या खड्यांच्या कुड्या तिच्या कानात चमचमत होत्या. जितेंद्राच्या मनात आलं, 'खरोखरच ही देखणी आहे. मोहनसारख्या भ्रमरवृत्तीच्या माणसाला मोह पडावा असं हिचं रूप आहे खरं !'

जितेंद्र तिच्याकडे असा पहात होता आणि विनीता त्याच्याकडे पाहून हसत होती. तिनं परत एकदा आपल्या मधुर आवाजात त्याला विचारलं होतं, "कामात आहात काय ? माझं जरा काम होतं."

जितेंद्रानं हसून तिला आत यायला सांगितलं होतं. ती आत आली होती आणि त्याच्याशी जवळ जवळ पंधरा-वीस मिनिटं कामाबद्दल बोलत होती. तिला हव्या असलेल्या साऱ्या सूचना तो देत होता आणि तिच्याकडे पाहता पाहता त्याच्या मनात येत होतं, 'ही इतकी निरागस बाई, एवढ्या मोकळ्या स्वभावाची ही विनीता मोहनच्या मोहजालात सांपडेल काय ?"

तिच्याकडे पाहून त्याच्या मनानं आपल्या या सर्व प्रश्नांना नकारार्थी उत्तर दिलं होतं. कां ते त्याला समजलं नव्हतं, परंतु त्याच्या मनात तिच्याविषयी कणव उत्पन्न झाली होती. तिच्याविषयी एक नकळत ओलावा निर्माण झाला होता.

त्या दिवशी संध्याकाळी घरी आल्यावर जितेंद्रानं ऑफिसमध्ये घडलेल्या साऱ्या गोष्टी सुनेत्राला सांगितल्या होत्या. त्यावेळी तिनं मोठ्या गंभीरपणानं त्याला म्हटलं होतं, "तुम्हाला जर खरच ती फार चांगली वाटत असेल, तर तिला सर्व गोष्टी स्पष्ट सांगून टाका. कुणाचं नुकसान निदान जाणून बुजून होऊ नये."

"ते खरं ग ! पण मी तिला कसं सांगणार ? तिची माझी आत्ता कुठं नुसती ओळख होत आहे."

आणि हे जितेंद्राचं म्हणणं खरं होतं. त्यादिवशी खऱ्या अर्थानं त्यांची ओळख झाली होती. विनीतालाही जितेंद्राचा मितभाषी स्वभाव आणि कार्याचा उरक या दोन गोष्टी आवडल्या होत्या. तिचा स्वभाव जात्याच मोकळा होता. ऑफिसमध्ये ती सर्वांशीच मोकळेपणानं वागे. तिचा वक्तशीरपणा म्हणजे ऑफिसमध्ये एक कौतुकाचा विषय बनला होता. जितेंद्रालाही या गोष्टी समजत होत्या. आपली दोन मुलं आणि पती यांचं सर्व व्यवस्थित करून ही बाई इतकी वक्तशीर आहे, तिच्या कामात कुठंही बोट ठेवता येईल अशी चूक आढळत नाही, या गोष्टीचं त्याला फार कौतुक वाटे. सुनेत्राजवळ तो हे वरचेवर बोलून दाखवी आणि त्यामुळे सुनेत्रालाहि तिच्याविषयी आस्था निर्माण झाली होती. विनीताची व आपली ओळख व्हावी असं तिला फार वाटत होतं आणि ती तसं वरचेवर जितेंद्राजवळ बोलूनहि दाखवीत होती.

आणि सुनेत्राची इच्छा पुरी होण्याचा योग एकदा अगदी अकस्मात् आला होता. त्यादिवशी जितेंद्राचा एक मित्र फारा दिवसानी त्याच्या घरी आला होता. जितेंद्र फर्ममध्ये गेला होता. मित्राला तर जितेंद्राला जरूर भेटायचं होतं. तो मुंबईस नवखा होता आणि मग नाईलाजानं सुनेत्राला जितेंद्राच्या फर्ममध्ये यावं लागलं होतं. ती जितेंद्राच्या केबिनमध्ये गेली, त्यावेळी जितेंद्र विनीताला फर्ममधल्या काही कामाबाबत नोंद करून देत होता. सुनेत्राला पहाताच विनीता उठून उभी राहिली होती आणि तिचा हात धरून सुनेत्रा म्हणाली होती, "बसा ना विनीताताई !"

आपल्या नेहमीच्या स्वभावानुसार मोकळेपणानं हसत विनीतानं विचारलं होतं, "अय्या ! माझं नांव कसं ओळखलंत तुम्ही ?"

आणि तिला तितक्याच मोकळेपणानं उत्तर देत सुनेत्रा म्हणाली होती, "आहे आमची आपली एक जादू !"

**'पडणे'—धन्य ती कळा !**




नागालँडमध्ये पडला ! हे पाडला !!

आणि त्यांच्या या संवादानंच त्यांच्यात एक आत्मीयता निर्माण झाली होती. विनीता आणि जितेंद्र यांचे स्नेहरज्जू भराभर एकमेकात गुंतले जात होते. सुनेत्रा त्यांचा सुंदर गोफ विणीत होती. विनीताच्या मोकळ्या भावड्या स्वभावामुळे मोहन तिचा काही गैरफायदा घेईल किंवा काय ही एकच चिंता जितेंद्राला सतत ग्रासीत होती; परंतु अजून तसं काहीच घडलं नव्हतं. मोहन विनीताच्या बाबतीत फारसा उत्सुक नसावा असं जितेंद्राला वाटत होतं. आणि त्यामुळे त्याला एक प्रकारचं समाधानही वाटत होतं.

शोभा, शिरीन आणि मरलीन यांच्याशीही विनीता मोकळ्या मनानं हसत होती, बोलत होती. मोहनचा सेक्रेटरी विश्वास तर फार चांगला माणूस आहे असं आपलं प्रांजल मत ती जितेंद्राला वरचेवर ऐकवीत होती. जितेंद्र सारं ऐकून घेई. तिच्याकडे स्थिर नजरेनं पहात राही. आणि म्हणे, "हे पहा, तुझी ही प्रांजल मतं मला फारशी पटत नाहीत. शोभा अगर मरलीन जे सांगतात ते सारं खरं आहे असं कां वाटतं तुला ?"

"अहो पण माझ्याशी खोटं बोलून काय मिळणार आहे त्यांना ?"

विनीता आपले भावडे डोळे जितेंद्रावर रोखून विचारी. तिच्या या प्रश्नावर जितेंद्राला काय उत्तर द्यावं हे कळत नसे. विश्वास हा मोहनचा सेक्रेटरी फार चांगला स्वभावाचा आहे हे विनीताच बोलणं खोटं आहे असं त्याला म्हणता येत नव्हतं. परंतु त्याचं हे चांगुलपण कशासाठी आहे हे जितेंद्र विनीताला सांगू शकत नव्हता. मात्र शिरीन, शोभा अगर मरलीनप्रमाणंच विनीताही मोहनचं भक्ष्य होऊ नये अशी त्याची फार इच्छा होती. त्यासाठी तो धडपडत होता. पण त्याची ही धडपड एकतर्फीच तर होणार नाही ना, अशी त्याला भीति वाटत होती. कारण विनीताला आडवळणानं सांगून समजत नव्हतं, सुनेत्राचं तर असंच म्हणणं होतं की, या गोष्टी विनीताला सांगून तिच्या भोळ्या मनाला नसता डंख लावू नये. अजून तरी मोहन तिच्या वाटेला गेला नव्हता. कदाचित् तिचा चांगुलपणा ओळखून तो गेलाहि नसता.

परंतु जितेंद्राला हे पटत नव्हतं. धोक्याचा लाल दिवा विनीताला दाखवला पाहिजे असं त्याचं मत होतं, आणि शेवटी एक दिवस संधी साधून त्यानं तिला म्हटलं, "विनीता, पुढच्या महिन्यात जवळ जवळ पंधरा दिवस मी ऑफिसमध्ये नसणार. टूरवर जाणार आहे मी!"

"हो ! आज सकाळीच मला मरलीन म्हणत होती."

"मरलीन ? तिचा काय संबंध ?"

"तुमचा प्रोग्रॅम टाईप केला ना तिनं ! मोहनसाहेबांचा सारा पत्रव्यवहार हल्ली तीच पहात असते. खरंच मोहनसाहेब किती सरळ आणि मोकळे आहेत नाही हो ?"

जितेंद्रानं चमकून वर पाहिलं. विनीता आपले कोपर त्याच्या टेबलावर टेकून बसली होती. जितेंद्राच्या नजरेतली नाराजी तिनं टिपली की नाही ते त्याला समजलं नाही. आपल्याच नादात ती पुढं म्हणाली, "परवा मी आणि शोभा चहाला खाली कॅंटीनमध्ये



अनुक्रमणिका








होतं. जितेंद्राला येऊन दोन दिवस झाले होते तरी ती त्याला निवान्त भेटली नव्हती. अलीकडे तिचं काम वाढलं होतं, तिला बढती मिळाली होती आणि त्यामुळे तिला पूर्वीसारखा मोकळा वेळ मिळत नव्हता.

जितेंद्र हे सारं पहात होता. टूरवरून आल्यापासून तोही थोडा अस्वस्थच होता. फर्मनं जी फार मोठी जबाबदारी त्याच्यावर टाकली होती, ती जबाबदारी तो यशस्वीपणानं पार करू शकला नव्हता. फर्मनं दिलेल्या भावात आणि बाहेरच्या भावात फार तफावत पडली होती. त्याला खरेदी करताना फार त्रास झाला होता आणि जी काही खरेदी करून तो आला होता, ती फारशी समाधान-कारक नव्हती. डायरेक्टरांच्या बैठकीत तसा सूर उमटला होता. या सर्व गोष्टींमुळे जितेंद्र तसा अस्वस्थच होता आणि त्यात भर म्हणूनच काय अलीकडे विनीता बदलली असावी अशी शंका त्याला येत होती.

या शंकेनं त्याच्या मनात मूळ धरावं अशा काही घटनाही घडल्या होत्या. तो आला त्यादिवशी सुनेत्रानं खास त्याच्यासाठी म्हणून बटाटा परोठे केले होते आणि त्याच्या डब्यात पाठवले होते. जितेंद्राला ते माहीत होतं. लंचच्या वेळी त्यानं विनीताला बोलवायला मुद्दाम शिपाई पाठवला होता, परंतु विनीता आधीच लंचला निघून गेली होती. विनीताचं हे असं जाणं जितेंद्राला नवीन होतं. खरं म्हणजे पूर्वीच्या परिपाठानुसार आज तिनंच काहीतरी विशेष पदार्थ आणायला हवा होता आणि जितेंद्राच्या आधी तिनंच येऊन म्हणायला हवं होतं, "चला, आज तुमच्यासाठी खास गंमत करून आणली आहे."

तिच्या त्या मिष्कील डोळ्यांकडे पहात जितेंद्रानं विचारलं असतं, "अस्सं ? पण आज सुनेत्रानं बहुतेक बिरयाणी पाठवली असावी तेव्हा—"

"असूं दे ! पण आम्ही एवढं केलंय ते तुम्हाला खायलाच हवं बरं का ?" आणि एवढं बोलूनच ती थांबली नसती, तिनं जितेंद्राला सारं आग्रह करकरून खायला घातलं असतं. पण आज हे काहीच घडलं नव्हतं. उलट आज जितेंद्रानंच तिला बोलावणं पाठवलं होतं आणि ती आली नव्हती. जितेंद्राची चौकशीही न करता निघून गेली होती. तिचं हे वागणं जितेंद्राच्या मनाला त्रास देत होतं. विनीता भेटली की तिला याबद्दल विचारावं की नाही याचा त्याच्या मनात गोंधळ उडाला होता. शेवटी आज तरी आपण होऊन विनीताशी बोलायचं नाही असं त्यानं ठरवलं आणि तो आपल्या कामाला लागला.

विनीताचे विचार दूर करून जितेंद्र कामाला लागला खरा पण आज नीट काम करू द्यायचंच नाही असं जणू विनीतानं ठरवलं होतं. त्यानं आपलं मन कामात गुंतवलं आणि तो कामात पुरता गढून गेला. त्यानं दोन चार फाईली हातावेगळ्या केल्याही, परंतु तेवढ्यात विनीता झपाझप त्याच्या केबिनमध्ये आली. त्यानं 'बस' म्हणायच्या आधीच ती त्याच्या समोरच्या खुर्चीत बसली. तिच्याकडे न पाहताच जितेंद्रानं विचारलं "हं, काय काम आहे ?"

आपल्या नेहमीच्याच खळखळून हंसण्यानं तिनं जितेंद्राची केबिन भरून टाकली आणि तसंच हसत राहत तिनं विचारलं, "कां ? कामाशिवाय कुणी इथं येऊ नये, असा काही नवा नियम केला आहात की काय ?"

"छे ! छे !! मी आहे तोच आहे ! नवे निती-नियम आणखी कुणी केले असले तरी त्याची मला काही कल्पना नाही."

जितेंद्राचं ते थोडसं कडवट बोलणं विनीताला थोडसं लागलं. आपलं हसणं थांबवून तिनं जितेंद्राकडे पाहिलं आणि विचारलं, "तुम्ही काय बोलता ते मला कळत नाही."

"न कळण्याजोगे असं मी काही बोलतच नाही."

"तुमचं काहीतरी बिनसलेलं दिसतंय! रागवला आहात काय ?"

"रागावण्याचं कारण ? मी रागवावं असं काही घडलं आहे का ?"

"ते मला काय माहीत ? मी आता आले होते, तुमच्याकडून अभिनंदन करून घेण्यासाठी ! तुम्हाला कळलंच असेल, मला वरची पोस्ट मिळाली है ! विश्वासरावानं माझं नाव रेकमेंड केलं आणि मोहनरावांनी लागलीच संमती दिली. खरच एवढ्या लवकर मला प्रमोशन मिळेल अशी स्वप्नातही कल्पना नव्हती मला. तुम्ही सगळीच माणसं फार चांगली आहात !"

विनीताचं सारं बोलणं जितेंद्र मुकाटयानं ऐकत होता. त्याच्या त्या घुम्या चेहऱ्याकडे लक्ष जाताच विनीता म्हणाली, "मी दुपारी लंचला आले नाही, म्हणून राग आलाय तुम्हाला. पण खरंच सांगते मोहनसाहेबांच्या आग्रहामुळे माझा नाइलाज झाला. ते इतकं आर्जवी बोलतात की, माणसाला नाही म्हणताच येत नाही."

"हा अनुभव कधी आला ?"

"कधी कसला ? रोजच येतो की ! मलाच नाही शिरीनचंहि तेच म्हणणं आहे. शोभा तर म्हणते 'मोहनसाहेबांचे डोळेच असे आहेत की माणसाला जणु ते भारून टाकतात."

---

**'पडणे'—धन्य ती कळा !**

हे 'सर्वांगने' पडणे आ.ण पाडणेही !

गेलो होतो, त्यावेळी मोहनसाहेब तिथं आले होते. [मुद्दाम] आमच्या टेबलावर येऊन बसले, माझी सारी चौकशी केली आणि आवर्जून त्यानी मला घरी बोलावलं. खरं म्हणजे एवढा मोठा माणूस, पण किती साधा स्वभाव आहे हो त्यांचा !"

जितेंद्र ते ऐकत होता आणि आतल्या आत ढवळून निघत होता. विनीता साधी भोळी आहे, तिला वाईटाचा सुगावासुद्धा लागत नाही हे सुनेत्राचं म्हणणं खरं होतं. तिच्या भावडया स्वभावाला वाईटाचा दंश होऊ नये अशी सुनेत्राची इच्छा होती आणि म्हणूनच जितेंद्रानं अनेक वेळा सांगूनही सुनेत्रानं विनीताला मोहनबद्दल इशारा दिला नव्हता. अजूनपर्यंत मोहन विनीताच्या बाबतीत स्तब्ध होता; पण आता त्यानं हळू हळू पावलं टाकायला सुरुवात केलेली होती. जितेंद्राला आज ते समजत होतं. विनीताला काहीतरी सांगण्याची हीच वेळ आहे हे तो जाणून होता. पण कसं सांगावं हे मात्र त्याला उमगत नव्हतं.

जितेंद्र-विनीताचा स्नेह आता खूपच रुजला होता. दोघांच्याही हृदयात या स्नेहाचे विसतंतू खोलवर गुंतले होते. जितेंद्र लेखक होता. उत्तम व्यासंगी लेखक होता हे विनीताला समजलं होतं आणि ती अधिकच स्नेहानं जितेंद्राकडे पहात होती. तिच्या काव्यावर जितेंद्राचा हात फिरत होता आणि या ना त्या निमित्तानं ती दोघं अधिकाधिक जवळ येत होती. सुनेत्रा आपल्या पतीच्या या मैत्रीणीचं भरघोस कौतुक करीत होती. विनीताच्या पतीला जितेंद्राबद्दल आदर होता. कुठल्याहि अपवित्र, ओंगळ भावनेला थारा न देता त्यांचा स्नेह वाढत होता. आणि ही गोष्ट दोघानाही फार अभिमानाची वाटत होती. आपला स्नेह ही अलौकिक ठेव आहे याची जाणीव जितेंद्राला पूर्णपणानं झालेली होती आणि म्हणूनच आपल्या या मैत्रिणीला मोहनच्या मोहापासून जपलं पाहिजे ही त्याची भावना झालेली होती. आता तो पंधरा-वीस दिवस टूरवर जाणार होता. आपण ऑफिसमध्ये असताना आणि विनीताचा आणि आपला स्नेह ठाऊक झाला असताना विनीतेबाबत काही हालचाल करण्याचं धाडस मोहनला झालं नसतं. जितेंद्र हे पक्कं ओळखून होता. अलीकडे शिरीन, शोभा अगर मरलीन यांच्याशी विनीताचं संघटन थोडं वाढलं होतं हे जितेंद्राला कळत होतं, याबद्दल त्यानं एक दोन वेळा नाराजीही व्यक्त केली होती. विश्वास आणि त्याचा चांगुलपणा याविषयीही तो विनीताजवळ बोलला होता, पण दरवेळी विनीतानं आपलं नाक उडवीत त्याला म्हटलं होतं, "अहो, असतील त्या वाईट. पण माझ्याशी तर त्या चांगलं वागतात ना ? आणि आपण चांगलं असलं म्हणजे झालं ! करायचं आहे काय या गोष्टींशी आपल्याला !"



त्यावेळी त्यांचे आणि मोहनचे काय संबंध आहेत हे जितेंद्र तिला स्पष्ट करू शकला नव्हता. किंवहुना एका स्त्रीशी या बाबतीत कसं बोलावं हाच त्याच्यापुढे मोठा बिकट प्रश्न उभा होता. साऱ्या गोष्टी स्पष्ट करणं त्याला जमत नव्हतं. तो प्रयत्न करीत होता आणि सांगत होता. पण त्या सांगण्याचा उमज विनीताला पडत नव्हता. ती होती तशीच होती. हंसत होती, मोकळेपणानं बोलत होती, आणि आपल्या अस्तित्वानं सर्वांनाच उल्हसित करीत होती आणि जितेंद्र आतल्या आत तडफडत होता. काळजीनं व्यग्र होत होता.

आजही तो विनीताला हेच सांगणार होता. मोहनच्या धोक्याची सूचना देणार होता. परंतु त्याचं बोलणं सुरू होण्याआधीच विनीतानं मोहनचे गोडवे गायला सुरुवात केली होती. या पार्श्वभूमीवर आपल्याला जे सांगायचं आहे ते आपण कसं सांगावं याचा त्याला विचार पडला होता. आपल्या केसातून विमनस्कपणानं त्यानं हात फिरवला, एकदा विनीताकडे नजर टाकली आणि त्यानं सारं बोलून टाकायचंच असा मनाशी निश्चय केला. त्यानं आपल्या ओठावरून जीभ फिरवली आणि तो म्हणाला, "हे पहा विनीता, आज मला तुझ्याशी काही गंभीर गोष्टी बोलायच्या आहेत. हे बघ, तू आणि मी दोघंही विवाहित आहोत, आपण दोघंही एकमेकांच्या. . . "

पण त्याचं वाक्य पुरंच झालं नाही, तेवढ्यात त्याला मीटींग-साठी तातडीचं बोलावणं आलं आणि विनीता त्याच्याकडे आश्चर्यानं पहात असतानाच तो केबिनच्या बाहेर पडला.

आणि मग दोन दिवस त्याला मुळीच उसंत मिळाली नाही. डायरेक्टरांच्या बैठकीवर बैठकी होत होत्या. फर्मच्या सर्व काम-काजाचा आढावा घेतला जात होता आणि जितेंद्राला त्याच्या टूर-विषयी एकापाठोपाठ एकेक सूचना मिळत होत्या. फर्मसाठी लागणाऱ्या सामानाच्या फार मोठ्या खरेदीची जबाबदारी जितेंद्रावर टाकली गेली आणि अशा धावपळीतच जितेंद्रानं आपल्या टूरला सुरुवात केली. विनीताला जे सांगायचं होतं ते राहूनच गेलं.

आपली टूर संपवून जितेंद्र परत आला आणि त्याला सगळंच निराळं दिसत होतं. कधी नाही ते विनीताचं उशीरा येणं सुरू झालं









"आणि मरलीनचा काय अनुभव आहे ?" थोडचा खवचट-पणानंच जितेंद्रानं विचारलं होतं.

त्याच्या बोलण्यातली खोच विनीताला खात्रीनं जाणवली असावी. कारण मग ती फारसं न बोलताच निघून गेली होती. तिच्या चालीतला नाराजीचा भाव जितेंद्राला जाणवला नव्हता असं नाही आणि ती अशी नाराज झालेली पाहून त्याला थोडं समाधानहि वाटलं. यामुळे तरी तिला काही उमज पडेल अशी त्याची कल्पना होती.

पण आता आठ-दहा दिवस होऊन गेले तरी विनीताच्या वागण्यात फारसा फरक पडला नव्हता. उलट पक्षी असं म्हणता आलं असतं की, ती अलीकडे जितेंद्राला टाळीतच होती. तिच्या बोलण्या-वागण्यात एक नवाच औपचारिकपणा आला असावा अशी शंका जितेंद्राला येत होती. आताहि तो केबिनमध्ये येऊन बसला होता, त्यानं फाईलीत डोकं खुपसलं होतं, पण त्याचं मन चाहूल घेत होतं ती विनीताच्या पावलांची ! त्याच्या केबिनमध्ये वेडी-वाकडी पसरणारी तिची छाया त्याच्या पूर्ण परिचयाची होती. सुनेत्राशी कसलीही प्रतारणा न करता, विनीताकडून स्नेहाखेरीज कसलीही अपेक्षा न करता, त्याला हे कळून आलं होतं की, आपलं जीवन आता विनीतानं व्यापलेलं आहे. तिच्या दर्शनानं आपल्याला मिळणारा आनंद आगळा आहे. तिच्या मधुर हसण्याची माधुरी मनाला मोहरून टाकणारी आहे. तिचं निर्व्याज बोलणं कानाला तृप्त करणारं आहे आणि त्यासाठी आपण आसुसलेले आहोत. विनीताच्या निर्व्याज स्नेहाची आपली भूक कधीही न शमणारी आहे आणि आज त्या स्नेहाच्या पाऊलवाटेवर मोहन आपली फणा काढून उभा आहे. जितेंद्राच्या मनात आलं, मोहनला दूर करायचंच म्हटलं तर ते काही फारसं कठीण नाही, पण असं करताना विनीताच्या प्रतिष्ठेला धक्का लागता कामा नये हे त्याला जपायला हवं होतं. ते त्याचं कर्तव्यच होतं. मोहनचा हा चांगुलपणा, त्यानं दिलेली ही बढती या साऱ्या गोष्टी म्हणजे विनीताला आपल्या जाळ्यात ओढण्यासाठी म्हणून दाखवलेली आमीषं आहेत हे जितेंद्र पुरा जाणून होता. प्रश्न एवढाच होता, धोक्याचा लाल कंदील विनीताला कसा दाखवायचा !

मोहनचा आवाज कानांवर येताच जितेंद्राची विचारमालिका तुटली होती. मोहन कुणाला तरी दिलखुलास आवाजात म्हणत होता, "वा ! वा !! आज तुम्ही संध्याकाळी आमच्याबरोबर आलंच पाहिजे. कुठलीही सबब चालणार नाही."

"अय्या, पण मला ते कसं शक्य होईल ? घरी जायला उशीर होईल आणि मग धाकटा बाबा त्रास देईल."

"त्याची काळजी करू नका ! मी स्वतः गाडीनं पोहचवीन तुम्हाला.

मोहनचं आणि विनीतेचं हे बोलणं केबिनमध्ये बसून जितेंद्र ऐकत होता. त्याच्या जीवाची तगमग चालली होती. ही भोळी निरागस विनीता तिच्या नकळत या सर्पाच्या वारुळात शिरत आहे हे त्याला समजत होतं. तिला मागे ओढलीच पाहिजे या विचाराचा त्याच्या मनावर एवढा पगडा पडला की त्याच्या नकळत तो ओरडला,

"विनीता इकडे ये !"

जितेंद्राची हाक वाजवीपेक्षा मोठ्या आवाजातली आली असावी. कारण गडवडीनं दार ढकलून विनीता आत आली. आणि भांबावलेल्या चेहऱ्यानं उभी राहिली. जितेंद्रानं आपल्याला इतक्या तातडीनं कां बोलावलं असावं याचा तिला विचार पडला होता. जितेंद्रानं तिच्याकडे एकदा भेदक नजरेनं पाहिलं आणि तो म्हणाला, "विनीता, हे सारं तुला सोडलंच पाहिजे. माझं तुला ऐकलच पाहिजे."

जितेंद्राच्या बोलण्याचा विनीताला नीटसा उमज पडला नसला तरी त्याचा एकूण भावार्थ तिला कळला होता. अलीकडे मोहनचं आणि आपलं वाढत चाललेलं संघटन जितेंद्राला आवडत नाही हे तिनं ओळखलं होतं. आणि त्याच्या या न आवडण्याचं तिला नवलही वाटत होतं. जितेंद्र जसा तिचा एक सहाध्यायी, वरिष्ठ होता, तसाच मोहनही होता. ती जितेंद्राशी ज्या मोकळ्या मनानं बोलत चालत होती त्याच मोकळ्या स्वभावानं ती मोहनशी वागत होती. आपल्या वागण्यात तिला कुठंच काही गैर दिसत नव्हतं. जितेंद्राइतकंच मोहनचं वागणं सभ्यपणाचं होतं. किंबहुना जितेंद्रापेक्षा तो अधिक मृदु सृजनशील होता. त्याच्या वागण्या बोलण्यातलं आर्जव फार गोड होतं. मदतीसाठी त्याचा हात सदाच पुढे होता. आणि याचा अनुभव विनीतेला आलाही होता. तिच्या मोठ्या मुलाला ताप आला असताना घरी जायला उशीर होऊ नये म्हणून त्यानं मुद्दाम विनीतेला आपल्या गाडीतून पोहोचवलं होतं आणि "थांबा देसाई आता येतील, कपभर चहा घेऊन जा,' असं तिनं सांगितलं असताही 'काम आहे' असं म्हणून तो निघून गेला होता. आपला कामाचा बहुमोल वेळ त्यानं केवळ विनीतासाठी खर्च केला होता आणि तिला घरी पोहोचवून देताच तो क्षणभरही तिथं थांबला नाही नव्हता. त्याचा सज्जनपणा त्यावेळी तिच्या प्रत्ययाला आला होता.

आणि आता जितेंद्राच्या बोलण्याचा नूर तिच्या लक्षात आला होता आणि ती जितेंद्रावर नाराज झाली होती. जितेंद्रानं आपल्या स्नेहाच्या बदल्यात तिच्यावर असली हुकमत गाजवावी हे तिला आवडलं नव्हतं. तिनं आपली भ्रुकुटी उंचावून विचारलं, "म्हणजे? काय सोडायला सांगता तुम्ही ?"

तिचा तो प्रश्न ऐकून जितेंद्र आणखीनच संतापला. त्यानं आपला हात टेबलावर रोवीत म्हटलं, "मुद्दाम वेड पांघरू नकोस ! मोहनचा आणि तुझा वाढता परिचय तुला थांबवलाच पाहिजे."

"कारण ?"

"कारण तो नालायक माणूस आहे. आतापर्यंत अशा शेकडो मुलींचा त्याने घात केला आहे."

"मला नाही तसं वाटत! मला त्यांचा जो अनुभव आला आहे तो, फार निराळा आहे. तुम्ही सांगताय त्या गोष्टीवर माझा विश्वास बसत नाही."

"म्हणजे मी खोटं बोलतोय असं का तुला म्हणायचं आहे ?"

[पान ३० वर पहा]









# आमच्या बंगल्यातला पहिला पावसाळा

**बाकी** काही म्हणा, माणसाला आपलं घर म्हटलं म्हणजे काहीतरी वेगळंच वाटतं. वेगळाच अभिनिवेश चढतो त्याला. 'घर पाहावं बांधून' वगैरे असं उगाच नाही म्हटलं! घराची कल्पना माणसाच्या मनात अगदी घर करून बसलेली असते. मनातल्या मनात तो कितीतरी इमले त्यावर चढवीत असतो. घरासाठी माणसाची सारखी घरघर चालू असते. अशी घरघर मलाहि गेली कित्येक वर्षं लागली होती. आणि सांगायला आनंद वाटतो की हौसिंग सोसायटीत (आमच्या ऑफिसच्या) भाग घेऊन मी यंदाच्या एप्रिल महिन्यात माझ्या स्वतःच्या स्वतंत्र घरात—म्हणजेच 'बंगल्या'त—राहायला आलो होतो.

उकाड्यानं जीव हैराण होणाऱ्या भाड्याच्या 'टिनपाट' घरातून निघून माझ्या बंगल्याच्या व्हरांड्यात, संध्याकाळच्या पश्चिमेकडून येणाऱ्या थंडगार वाऱ्याची झुळुक अंगावर घेतली तेव्हा किती सुखावलो होतो मी! दुसरंहि एक कारण होतं, बंगल्याच्या पूर्ततेसाठी मी गेली तीन चार वर्षं माझ्या सगळ्या हौसामौजा मनात मारून पैसा उभा केला होता. बंगला जरी सोसायटीच्या ताब्यात अजून येती वीस वर्षं राहाणार होता तरी तो त्यानंतर माझाच होणार होता ही सुखद जाणीव मला होत होती.

माझ्या बंगल्यात दिवसभर खूप उकडायचं परंतु संध्याकाळ झाली म्हणजे थंडगार वाऱ्यात वावरायला मजा येत होती. महाबळेश्वराला यापेक्षा जास्त काय असणार? माझी सौभाग्यवती गेली कित्येक वर्षं दर उन्हाळ्यापूर्वी, "यंदाच्या उन्हाळ्यात आपण महाबळेश्वरला आमच्या मामांकडे जाऊ या" असं म्हणत असे. पण यंदा मी तिला म्हटलं, "या उन्हाळ्यापासून दर उन्हाळ्यात तुझ्या मामानाच आपल्याकडे बोलावून घे. तिकडे महाबळेश्वरला महागाईनं त्यांचा जीव हैराण होत असेल." बंगल्याचा माझ्यापेक्षा माझ्या सौभाग्यवतीलाच फार अभिमान वाटत होता. आमच्या बंगल्याबद्दल ती असं काही बोलत असे की, शहाजहानला, ताजमहाल बांधण्यासाठी आमच्या बंगल्यापेक्षा जास्त खर्च आणि वेळ लागला नसेल. शिवाय आमच्या बंगल्यासाठी आम्हाला सगळा खर्च करावा लागला नव्हता. ऑफिसकडून कर्ज मिळालं होतं. ताजमहाल बांधण्यासाठी शहाजहानला तरी सगळा खर्च रोख सोसावा लागला होता. आणि बिचारी नूरजहान मेल्यानंतर शहाजहानने ताजमहाल बांधला होता म्हणजे त्या बिचारीला काहीच उपयोग नाही. जणु काय, मी माझ्या बायकोवरील प्रेमाखातर ती जिवंत असतानाच हा बंगला बांधला अशी ती बढाई मारत असे. बंगल्याच्या संदर्भात ती, माझ्या पश्चात् माझ्याबद्दल स्वतःच्या मैत्रिणीजवळ बरं बोलत असते हे ऐकून मला धन्य वाटलं!

'नेमेचि येतो मग पावसाळा, सृष्टीचे कौतुक हे जाण बाळा' हे मी अगदी बाळपणापासून म्हणत आलो होतो. पण भाड्याच्या कौलारू, पत्र्याच्या घरात, पावसाचे कौतुक न वाटता, त्याची धडकी भरत होती. पावसाळ्यात आमचं भाड्याचं घर जे गळायला लागायचं त्यात माझ्या सौभाग्यवतीच्या माहेराहून लग्नाच्या वेळी मिळालेली सगळी भांडी उपयोगी पडा-

ग. का. मडकमकर

यची. त्या भांड्यात तिच्या माहेरच्यांना स्वयंपाक शिजवून वाढला जाण्याच्या-ऐवजी, पावसाचं पाणी भरलं जावं या गोष्टीनं तिचा चडफडाट व्हायचा. एकदा पावसाळ्यात तिच्या उशाजवळच, गळतं पाणी साठवून ठेवण्यासाठी मांडलेलं पातेलं तिच्याच हातून सांडलं आणि सगळं पाणी तिच्या गादीखाली जाऊन जी गंमत झाली ती पाहून माझी करमणूक झाली होती, पण संतापानं ते पातेलं तिनं जे भिरकावलं ते त्याला एकदम पाचसात पोचे आले. माझ्यावर न रागावता भांड्यांची आदळ-आपट करण्याची माझ्या बायकोची ती पहिलीच वेळ! मी तिला हसून म्हटलं, "तुझ्या माहेराहून साधी भांडी मिळाली होती त्यांना तू ठोक्याची बनवते आहेस का?"

"हो:! तुम्हाला चेष्टाच सुचायची. आमचा जन्म असाच भाड्याच्या घरात जायचा. तुम्हाला काही स्वतःचं घर असावं असं वाटायचं नाही."

"पुष्कळ वाटतं ग, पण तुझ्या झाड्यां-षायी मला ते जमत नाही." असं म्हणा-यचं ओठांवर आलं होतं पण ते, तिच्या हातून शिजणाऱ्या रोजच्या स्वयंपाकाप्रमाणे निमूटपणे आत ढकललं. आमच्या बाय-कोच्या हातचा स्वयंपाक हा प्रबंधाचा एक विषय मी सांगत बसलो तर विस्तारभय संभवते. तिचा विस्तार हाहि एक प्रबंधाचा विषय आहे. असो. एका गोष्टीची गंमत वाटते. दुकानातून दुरुस्त करून आणलेला स्टो घरी आणताच आणखी कां बिघडावा, नवा कोरा पेन घरी येताच शाई कां ओकू लागावा ह्या प्रश्नांची उत्तरं जशी सापडत नाहीत त्याप्रमाणे आमचं भाड्याचं घर शाकारणी केल्यानंतर पूर्वीपेक्षा जास्तच कां गळू लागावं हा एक चिंतनीय विषय आहे.

शेवटी ठरवलंच, की स्वतःचं घर बांधायचं!

आणि बांधलं! तोच माझा 'बंगला'!

जूनच्या पहिल्या पंधरवड्यात थोडासा पाऊस पडला. भोवतीच्या मोकळ्या

**शहाजहान आणि देसाई यांनी पत्नीवरील प्रेमाखातरच बंगले बांधले. पहिल्याचा 'ताजमहाल' तर दुसऱ्याचा 'राणीचा बंगला'; पण शहाजहाननं ताजमहाल बांधला तो पत्नीच्या मृत्युनंतर. देसायांचा बंगला तर त्यांच्या सौ. च्या आग्रहामुळेच साकार झाला होता. दोन्ही बंगल्यामधील साम्य म्हणजे पावसाळ्यात दोन्ही गळतात आणि भेद म्हणजे देसायांच्या बंगल्या-खालील भूमीत 'पेट्रोल' सापडलं. त्यामुळे देसायांना बंगला सोडावा लागला तरी त्यांचं नांव तेथील फलकावर झळकणार होतं. शहाजहानला तसं भाग्य कुठं लाभलं?**

भागातली जमीन भिजून निघाली, आणि तिचा सुवास पसरला. मृद्‌गंध मृद्‌गंध म्हणतात तोच हा हे मला जाणवलं! ऋतुपालट झाल्याचं मला जाणवलं आणि कां कुणास ठाऊक पण कालच लग्न झाल्यासारखं वाटायला लागलं! ....

रात्री जाग आली, ती वरच्या तक्त-पोशीतून पडणाऱ्या टप्‌टप् थेंबांमुळे! आम्ही सगळेजण गडबडीनं उठलो.

बाहेर धो धो पाऊस पडत होता. वीज चमकत होती पण घरातले दिवे गेले होते. घरात लहानशीच बॅटरी होती. तिचा उपयोग होण्यासारखा नसल्याने मी बायकोला कंदिल कुठे आहे म्हणून विचा-रलं तर म्हणाली, "इश्श! बंगल्यात का कुणी कंदिल ठेवतं?" तिच्या डोक्याचं कौतुक वाटलं. इतक्यात गादीवर दुसरी-कडे टपटपायला लागलं. गादी गुंडाळून खाटीला मारली आणि बॅटरीच्या प्रका-शात तक्तपोशी पाहिली. अंतराअंतरावर पाण्याचे थेंब जमून गळण्याच्या बेतात होते.

ते थेंबहि गळायला लागले. जिथून प्रथम थेंब गळत होते तिथून पाण्याची संततधार सुरू झाली. शेवटी सगळीकडूनच धारा सुरू झाल्या. इतक्या जोरात सुरू झाल्या की घरबसल्या बाहेरच्या पावसाचा जोर कळत होता.

दुसऱ्या खोलीत पाहिलं तर तिथे केव्हाच तळं झालं होतं. त्या खोलीतलं पाणी हळुहळू अलिकडच्या खोलीत यायला लागलं होतं. आधुनिक घरात उंबरठे नसण्याचा तोटा मला तात्काळ जाणवला. 'बंगल्या'त अवजड भांड्यांची अडगळ नको म्हणून हिनं मोठी पातेली, पिंप पाण्याच्या डेगी माहेरी पोचवल्या होत्या. शिवाय घरात चोवीस तास पाणी होतं. त्यामुळे साठव-णाचा प्रश्न नव्हता. भांडीबिडी नव्हती तरी पाणी साठतच होतं. आम्ही जरा कोपऱ्यात भिंतीला टेकून आश्रय घ्यावा म्हणून गेलो तर भिंती कचकचीत ओल्या चिंब! कॉटची जागा बदलली. ती फोल्ड करून पाहिली पण ती कोरडी राहाण्याची चिन्हं दिसेनात. आम्ही कोरडे राहाण्या-साठी कॉटवर गाद्या टाकून तिच्याखाली बसणं श्रेयस्कर होतं; पण खालून पाण्याचे पाट वाहात होते. शेवटी ही वैतागून म्हणाली, "भाड्याचं घर बरं होतं. आजु-बाजूला भांडी पातेली मांडून झोपता तरी येत होतं. इथे भांडी मांडायची म्हणजे दुकान पुरायचं नाही."

"म्हटलं बाईसाहेब, आपला 'बंगला' आहे हा! भाड्याचं घर नाही?"

रात्रभर आम्हाला झोप मिळाली तर नाहीच पण मध्यरात्रीचं सचैल स्नान घडलं. कोलंबस पाण्यातून जमिनीच्या शोधाला निघाला होता. आम्हीदेखील पाण्यात कुठे कोरडी जागा दिसते का ते शोधत होतो. तशाहि अवघड परिस्थितीत मला आमची ही आमच्या बंगल्याचं जे ताजमहालसदृश वर्णन करीत असे त्याची आठवण झाली. ताजमहाल आणि आमचा








बंगला यात काहीहि साम्य नव्हतं तरी एका बावतीत साम्य आढळत होतं. ताजमहालहि पावसाळ्यात गळतो म्हणे !

सकाळ झाली. रात्रीच्या पावसानंतर सकाळच्या कोवळया उन्हात सृष्टि कशी टवटवीत आणि हिरवीगार दिसत होती. परंतु त्यावेळी आम्हा सर्व 'बंगले'वाल्यांचे चेहरे मलूल आणि काळे ठिक्कर पडले होते. जगातली कोणतीहि सुंदर गोष्ट पाहिली की परमेश्वराची आठवण होते. रात्रभरच्या पावसामुळे आमच्या बंगल्यांचं जे काही झालं होतं त्यामुळे आम्हाला कॉंट्रॅक्टरची आणि सोसायटीच्या सेक्रेटरीसाहेबांची आठवण होत होती.

सेक्रेटरीसाहेबांकडे गेलो तर माझ्या अगोदरच चारपांच बंगलेवाले तिथे येऊन बसले होते. सेक्रेटरीसाहेबांचं घर झकासपैकी कोरडं होतं की! सोफा सेट, स्टीलचं कपाट, फरशीवरचं लिनोलियम, खिडक्यांचे भारी कापडाचे पडदे सगळं कसं जसंच्या तसं होतं! म्हणजे त्यांचं घर सोडून आमच्याच बंगल्यांवर पाऊस कोसळला होता की काय? कुणीतरी कुजबुजलंच "कॉंट्रॅक्टरची कृपा" ! सेक्रेटरीसाहेबांचं घर 'वॉटरप्रूफ' बांधण्याचं कौशल्य कॉंट्रॅक्टरचंच! शिवाय त्याची कृपा म्हणजे सोफासेट, स्टीलचं कपाट वगैरे वगैरे! बांधकाम चालू होतं तेव्हा कॉंट्रॅक्टरच्या गाडीतून सेक्रेटरी आणि त्यांचे कुटुंबीय जात-येत होते खरे! शिवाय काही दिवस, त्याची गाडी सेक्रेटरींना ऑफिसात पोचवायला आणि घरी न्यायला आल्याचं आठवलं...'बंगले' गळताय्‌त त्याबद्दल तक्रार केली तर सेक्रेटरी म्हणाले, "हो-यंदा सुरुवातीला फारच पाऊस पडतोय्. असा पाऊस गेल्या शंभर वर्षात पडला नव्हता, असं आमचे वडील म्हणाले."

"ते जाऊ द्या. बंगले गळताहेत. त्याच्यावर उपाययोजना काय?"

"हे पहा देसाई, सिमेंटनं बांधकाम केलं की त्यावर पाणी मारावंच लागतं, बांधकाम पक्कं होण्यासाठी! पाऊस जोरात पडतोय्. बंगले आणखी पक्के होतील. काळजी करू नका. नवीन कन्स्ट्रक्शन जर गळलं नाही तर ते सदोष समजतात." सेक्रेटरी चक्क बनवण्याची भाषा करीत होते.

त्यांच्या घरात नजर फिरवत मी म्हटलं, "मग तुमचं घर सदोष बांधलं आहे असं समजायचं की काय? असल्या पावसानं आमचे बंगले पक्के होण्याऐवजी पडके होतील."

"हे पहा आजच्या आज कॉंट्रॅक्टरला बोलावून मीटिंग घ्या. कन्स्ट्रक्शनबद्दल ते काय ते सांगतील" श्री. भडके म्हणाले.

"ठीक आहे. त्यांना फोन करून बघतो. परंतु ते बहुतेक मुंबईहून आले नसतील. कारण माझ्यासाठी त्यांनी तिकडे टाकलेला सूट आला नाही. फूटपाथवर मिळणारी यार्डलेची सौंदर्यप्रसाधनं आमच्या मंडळींसाठी घेऊन येणार होते ते." आपण भलतंच बोलून गेलो हे लक्ष्यात येऊन सेक्रेटरींनी जीभ चावली.

"सेक्रेटरीसाहेब, आता बायकोच्या प्रसाधनापेक्षा आमच्या बंगल्यांच्या चुनेगच्चीचं पहा" भडके पुन्हा उखडले.

"तुम्ही अजिबात काळजी करू नका. त्यांचा अद्याप पन्नास हजारांचा चेक आपल्या ताब्यात आहे. काय वाटतील त्या समाधानकारक सुधारणा झाल्याखेरीज त्यांचे पैसे आपण देणार नाही" सेक्रेटरींनी वचन दिल्यानंतर मंडळी त्यांच्या घरातल्या उंची सामानाकडे तिरकस नजरांनी पाहात बाहेर पडली.

...ऑफिसात भरलेल्या मीटिंगमध्ये सभासदांनी कॉंट्रॅक्टरवर प्रश्नांची अशी काही गारपीट केली की, पावसात बंगले काय गळले असतील याची त्याला कल्पना यावी. चिंब झालेल्या बंगल्याप्रमाणे तो अंतर्बाह्य घामानं भिजून गेला. त्याला बोलणं सुचेना तेव्हा तो चाचरत म्हणाला, "हे पहा माझा काही दोष नाही. दोष आहे सावंत आर्किटेक्टचा. बांधकाम चालू असताना ते इकडे अजिबात फिरकले नाहीत. समाधानकारक बांधकाम करवून घेणं हे त्यांचं काम आहे."

"मग सेक्रेटरींच्या घराचं काम चालू असतानाच फक्त सावंत आर्किटेक्ट इकडे आले होते का? त्यांचा बंगला कां गळत नाही?" भडके उठले, "आणि काय हो सावंत" पांडुरंग सावंत या सभासदाकडे वळून ते म्हणाले, "तुमचा भाऊ आपला आर्किटेक्ट तुमचं यावर काय म्हणणं आहे?"

पांडुरंग सावंत म्हणाले, "हो. त्यानं यायला हवं होतं. आमची सुशी आणि तिचा नवरा इकडे आले आहेत तरी तूं एकदा येऊन जा असं त्याला कळवलं होतं. पण कामाच्या गर्दीमुळे येता येत नाही असं त्यानं उत्तर पाठवलं होतं..... पण मला वाटतं नवीन कन्स्ट्रक्शन हे गळणारच."

"ते तुम्ही नकोय् सांगायला. तुमच्या भावानं अगोदरच 'कंप्लीशन सर्टिफिकेट' देऊन ठेवलं आहे. तुमचं वेगळं सर्टिफिकेट नको–आता." जोगळेकर उठले, "बाकी सावंत म्हणजे काय....."

"जोगळेकर" सावंत ताडकन् म्हणाले, "आमच्या घराण्याबद्दल बोलण्याचं काही कारण नाही."

"आमच्या गळक्या घरांमुळे–नाही बंगल्यांमुळे–तुमच्या घराण्याचं नांव घेण्याची पाळी आली. नाहीतर तुमच्या घराण्याची लायकी ती...गळणं आणि कोसळणं यातला फरक समजतो का तुम्हाला सावंत?"

"पुन्हा तेच" सावंतांचा संताप कायम होता. "माहिती आहे हो तुम्ही चित्तपावन म्हणजे....."

"गप्प बसा गप्प बसा" असा इतरांनी गलका केला तेव्हा जरा शांत झालं. पण घुसफूस चालू होतीच.

सेक्रेटरींनी आर्किटेक्टला बोलावून घ्यावं आणि आर्किटेक्ट व कॉंट्रॅक्टर यांनी सुधारणांबाबत निर्णय घ्यावा असा ठराव होतो न होतो तोच आकाशात ढगांचा गडगडाट झाला आणि सेक्रेटरींनी सभासमाप्तीनंतर मागवलेल्या कॉफीचा मोह टाळून मंडळी बंगल्याकडे धूम पळत सुटली.

दगडानं ठोकून मडक्याचा कच्चेपक्केपणा ओळखावा तसा तो गडगडाट ऐकून येणाऱ्या पावसाची तीव्रता पटली.

रात्रभर जाम पाऊस पडला. सकाळी जरा तो कमी होताच अनेक बंगलेवाल्यांनी आपल्या कुटुंबीयाना गावातल्या नातलग आणि ओळखीच्यांकडे पोचवून दिलं. काही बंगलेवाल्यांनी चोरून ठेवलेले भाडेकरू उघडपणे पळून गेले.

यावेळचा पाऊस सतत चार दिवस टिकला. सर्व बंगल्यांच्या दाही दिशाना पाणीच पाणी झालं. गावातल्या नदीला पूर येऊन तो वाढण्याची शक्यता होती. नदीकाठच्या भागात राहाणाऱ्याना वायरलेसची गाडी इशारा देऊन गेली. बाकी पुण्याच्या पानशेतच्या धरणफुटीपासून पोलिसखातं जरा हुश्शार झालं आहे. पाऊस पडो वा न पडो जरा आकाशात ढग जमून आले की, एकदा नदीकाठच्या लोकाना इशारा देऊन यायचा हे ठरलेलं. असा इशारा दिला गेला की पाऊस गुल् व्हायचा. पावसानं आतापर्यंत अनेक गमती केल्या आहेत. अचानक कोसळून कपड्यांची इस्त्री घालवणं, डॉक्टरांचा धंदा वाढवणं, सखल भागात तळी निर्माण करणं, वाहतूक अडवणं, छत्र्या उलटया करून छत्र्यादुरुस्तीचा व्यवसाय करणाऱ्यांचा योगक्षेम चालवणं, पाणी साठलेल्या भागातून गमबूट घालून जाणाऱ्यांच्या बुटात पाणी भरलं जाऊन त्यांच्या पायात मणामणाच्या बेडया अडकवल्यासारखं वाटणं, एकाच वेळी अनेक वसंतसेना दाखवणं, इ. गमती आहेत. यंदा त्यानं आम्हा बंगलेवाल्यांची गंमत करायचं ठरवलेलं दिसत होतं. सांगायचं असं की आमच्यापैकी ज्यांनी आपल्या कुटुंबीयाना गांवातल्या नदीकाठच्या भागात राहाणाऱ्या नातलगांकडे पोचवलं होतं त्यांची, पोलिसखात्यानं तिथून पुन्हा सुरक्षित स्थळी—म्हणजे शाळातून—उचलबांगडी केली, आणि त्याना त्रिस्थळी यात्रेचं पुण्य दिलं.

आम्ही आमच्या बंगल्यात चार दिवस अडकून पडलो. वीज केव्हाच गेली होती. भोवती इतकं पाणी असताना नळांनीहि संप पुकारणं साहजिकच असतं. या सगळ्यांवर कडी 'आकाशवाणी' करीत होती. अर्थात् आम्ही ट्रांझिस्टर ऐकत होतो. महाराष्ट्रात ठिकठिकाणी पाऊस पडत असल्याच्या आनंदाच्या बातम्या येत होत्या. आणि त्याच्या जोडीला 'येरे येरे पावसा' आणि 'पाणीच पाणी चहूकडे' आणि तत्सम गाणी लावून आमच्या दुःखावर मिठाचं पाणी ओतत होती. 'आकाशवाणी' कधी नव्हे ती यावेळी खरी होत होती. 'येरे येरे पावसा' म्हटल्यानं अधिकाधिक 'पाणीच पाणी चहूकडे' होत होतं. आम्हाला कान्ह्याची आठवण येण्याऐवजी कॉंट्रॅक्टरची आणि आर्किटेक्टची आठवण येत होती.

त्या चार दिवसात जगाशी संपर्क तुटणे म्हणजे काय याची आम्हाला कल्पना आली....घरबसल्या समुद्रप्रवासाचा प्रत्यय येत होता. भोवती अथांग पाणी आणि वर आकाश! समुद्रप्रवासात पिण्याच्या पाण्याचे हाल व्हावेत तसे आमचेहि होत होते.

...भितीवरच्या फ्रेम्स खराब होऊ नयेत म्हणून त्या काढायला गेलो तर एक फ्रेम काढताना — हा फोटो आमच्या हौसिंग सोसायटीच्या भूमीपूजनाच्या वेळचा होता. कॉंट्रॅक्टरहि त्यात होताच—ती चक्क खिळ्यासकट निघून आली. आणि कॉक नसलेल्या नळातून पाणी पडावं तसं पाणी खिळयाच्या जागेतून खोलीत पडू लागलं. काय हा चमत्कार! पाणी साठवायचं साधन म्हणून भिंती बांधल्या होत्या काय? माझ्या बंगल्याच्या भितीतून, नळाला पाणी यावं, तसं पाणी आल्याचा चमत्कार पाहिल्यानंतर ज्ञानेश्वरांनी भित चालवून दाखवली हा चमत्कार अगदी जुजबी वाटतो! बस् जगात भिंती तीनच! पहिली माझ्या बंगल्याची, दुसरी बर्लिनची आणि तिसरी चीनची! आमचे सगळे व्यवहार पाण्यातूनच चालत असल्यामुळे आम्हाला श्रीनगर किंवा व्हेनिसची मातब्बरी वाटेनाशी झाली.

पोहत पोहत मी सेक्रेटरींच्या घरी गेलो आणि भितीतून पाणी आल्याचा चमत्कार सांगून कॉंट्रॅक्टरने भितीहि पोकळ बांधल्या आहेत अशी तक्रार केली तेव्हा ओशाळं (!) हसत ते म्हणाले, "तुम्हाला पदार्थविज्ञानशास्त्रातला तो नियम माहित असेलच. लोखंडी कांब

'पडणे'—धन्य ही कळा!



पडलो तरी ×× वर!—ज. द. गॉल

वाकवण्यापेक्षा पोकळ कांब वाकवायला जास्त शक्ति लागते. कारण पोकळ लोखंडी कांबेत निर्वात प्रदेश निर्माण झालेला असतो. तसंच तुमच्या बंगल्याच्या भिंतीचं दिसतय् ! भरीव भिंतीपेक्षा पोकळ भिंत अधिक टिकेल नाही का ? आणि दुसरी कानात गोष्ट सांगतो. पैसे साठवून ठेवायला अगदी सुरक्षित जागा आहे." सेक्रेटरी हसले. आता सेक्रेटरींना जागा समजल्यानंतर ती 'सुरक्षित' कशी हे मला समजेना. कपाटं, ढेकूण आणि उंदरांच्या बिळांबरोबर भिंतीत पैसे ठेवावेत हे पटत नव्हतं.

चार दिवसांनी पाऊस थांबला. गेल्या चार दिवसात जसजसा पाऊस पडत होता तसतसं वातावरण थंड होत होतं पण आमची माथी भडकत होती. पाऊस थांबला तशी आमची माथी पूर्ण भडकली. आधीच आम्ही मराठी माणसं, त्यात आमच्यावर अन्याय झालेला, सेक्रेटरींनी खेळलेलं राजकारण आणि निढळाच्या घामाची पैं (सा) पैं (सा) करून साठवलेली शिल्लक अक्षरशः पाण्यात जात असल्याचं पाहून आम्ही गप्प बसू ? फक्त माझ्या बंगल्यासमोर राहाणारे चौबळ शांत होते. आपल्या घराच्या पायरीवरचा गाळ साफ करता करता ते मला म्हणाले, "देसाई, अखेर माझंच खरं ठरलं. माझ्या बंगल्याचं नांव मी चंद्रमौळी असं जे ठेवलं आहे ते किती यथार्थ आहे हे तुमच्या लक्षात आलं असेल. महाराजा, याला म्हणतात द्रष्टेपणा !" मी कपाळावर हात मारून घेतला. पण नंतर त्यांना मी माझ्या 'राणीचा बंगला' नांवाच्या बंगल्यातून पाण्याबरोबर वाहात आलेला मारलेला सात फुटी साप दाखवला तेव्हा ते पळून गेले.

कॉलनीतले सगळे रस्ते वाहून गेले. मुख्य रस्ता ते कॉलनी हा ॲप्रोच–रोड कुठे होता ते आम्हाला समजेना. बंगल्यांची मयसभा झाली होती. पांडवांच्या मयसभेचं कॉंट्रॅक्ट आमच्याच कॉंट्रॅक्टरच्या पूर्वजांनी घेतलं असावं अशी शंका घ्यायला जागा होती.

पाऊस ओसरल्यानंतर भरलेल्या मीटिंगमध्ये मंडळी कॉंट्रॅक्टर, आर्किटेक्ट आणि सेक्रेटरी यांच्यावर जी तुटून पडली त्याला तोड नाही. अभिरूप लोकसभेचं स्वरुप त्या मीटिंगला आलं. शिव्यांचा गडगडाट होत होता, आणि ती तीन मंडळी भिजून निघत होती. पण शिव्यांनी काही होणार नव्हतं. आम्ही आणखी पांचपांचशे रुपये खर्च करायला तयार होतो पण किमान पांच सेंटिमीटर तरी जागा कोरडी राहावी अशी आमची मागणी होती. नियमाप्रमाणे कॉंट्रॅक्टरचं काम संपलं होतं. त्यामुळे फक्त दुरुस्तीकरता वेगळं टेंडर मागवण्याचं ठरलं. आर्किटेक्टकडून 'इथेच राहून' दुरुस्तीवर विनामूल्य देखरेख करण्याचं मान्य करवून घेतलं.

दुरुस्तीसाठी मागवलेल्या टेंडरात आमच्या बंगल्याचं काम करणाऱ्या कॉंट्रॅक्टरचंच सर्वात कमी दराचं टेंडर निघालं ते पाहून आमच्या तोंडचं पाणी पळालं. अर्थात्च ते टेंडर नाकारण्यात आलं. मध्यंतरात मी ऑफिसातून टिक्सोच्या चिकटपट्ट्या पळवून आणून आणि त्या स्लॅबवर चिकटवून तात्पुरती दुरुस्ती केल्याचं पाहून इतरानी तोच कित्ता गिरवला. कुणी कुणी दवाखान्यात जखमेवर बांधण्यासाठी असणाऱ्या कॅनव्हासच्या चिकटपट्ट्या आणून 'बंगल्या'ना मलमपट्टी केली.

दुसऱ्या कॉंट्रॅक्टरने दुरुस्ती काम सुरू केलं. पावसानं आता रजा घेतली होती. बहुतेकांची कुटुंबीय मंडळी परत आली. भाडेकरूनी गुंगारा दिला होता.

पाऊस थांबला पण नळ गेलेलेच होते. नगरपालिकेत चकरा सुरू झाल्या. पण पहिल्या पंचवार्षिक योजनेत अंतर्भूत असलेल्या शुद्ध पाणी पुरवठा योजनेची नुकतीच अंमलबजावणी सुरू झाली होती. आमच्या बंगल्यापलिकडे असलेल्या शेतातल्या विहिरीचं पाणी आम्ही भरू लागलो. नळ पुन्हा केव्हा येतील याची शाश्वती नसल्यामुळे मी स्वखर्चाने स्वतःच्या प्लॉटमध्ये नलिकाविहीर खोदून घेण्याचं ठरवलं. उद्देश दोन. केव्हाहि पाणी; आणि मीटरच्या पाण्याचे पैसे वांचावेत.

नलिका–विहिरीच्या खोदकामास सुरुवात झाली. खूप खोल खणलं तरी नळीतून पाणी येईना. पाणी लागेपर्यंत पाण्यासारखा पैसा खर्च करायचं मी ठरवलं होतं. . . नलिकेतून काळा द्रव पदार्थ बाहेर पडताच पहिल्या पावसात मुलांनी नाचावं तसा मी नाचलो. . .पण त्या काळ्या चिकट द्रव पदार्थाला वास येत होता. अशुद्ध पेट्रोलियम होतं ते.

माझ्या प्लॉटमध्ये पेट्रोलियम सापडल्याचं सरकारला कळलं. जागतिक तज्ञ लोकानी येऊन आणखी दोनचार ठिकाणी खोदकाम करून पाहिलं आणि तिथून बाहेर पडलेल्या द्रव पदार्थाचे नमुने ते घेऊन गेले. आमच्या कॉलनीतल्या जमिनीत पेट्रोलियमचे साठे होते.

काही महिन्यातच आम्हाला सरकारकडून रीतसर नोटीसा मिळाल्या. खनिज संपत्ति सापडल्यामुळे आमची सबंध कॉलनी सरकार ताब्यात घेणार होतं. नियमाप्रमाणे कॉंपेन्सेशन मिळणार होतं पण लवकरच आम्ही बेघर होणार होतो. पुन्हा घरघर लागली.

नलिकाविहीर खोदण्याची दुर्बुद्धी मला सुचल्याबद्दल माझे सहकारी मला शिव्याशाप देत होते पण एका राष्ट्रीय धनाची जागा दाखवल्याबद्दल सरकार दरबारी माझा भाव वाढला होता. रोजच्या रोज माझ्या, फोटोसकट मुलाखती छापल्या जात होत्या. पेट्रोलियम रिफायनरीचं उद्घाटन मी नारळ फोडून करणार होतो आणि प्रवेशद्वाराच्या बाजूच्या चौथऱ्यावर माझं नांव खोदण्यात येणार होतं. मला पुन्हा घर शोधावं लागणार आहे हा विचारहि माझ्या मनात येत नव्हता. मी हवेत तरंगत होतो.

●●●

या माणसाला हौस नाही, मौज नाही. कधी हिंडणं नाही, फिरणं नाही. सिनेमा नाही की नाटक नाही. सदा कपाळाला आठ्या नि बैठक. अशा माणसानं लग्न तरी कशाला करावं? खुशाल संन्यास घेऊन मोकळं व्हावं— एका तरुणीच्या मनातले तवंग........



# त वं ग

प्रा. लक्ष्मीकांत तांबोळी

**पांच** वाजायला पाच मिनिटे कमी. चहासाठी ती स्टोव्ह-वर पाणी ठेवते. त्याची ऑफीसा-तून यायची वेळ झाली आहे. आला की लगेच त्याला चहा लागतो. हे तिला ठाऊक आहे. थोडासा उशीर देखील त्याला चालत नाही. उशीर झाला की लगेच संतापतो. त्याचे सगळेच वक्तशीर. नियम-बद्ध. आखलेले. अगदी यांत्रिक. कधी म्हणून बदल नाही.

बरोबर पाच वाजता दारावरची बेल वाजते. हसत हसत ती दार उघडते. तो तिच्याकडे बघतही नाही. हे नेहमीचेच. निदान आज तरी तो आपल्याकडे पाहील असे तिला उगीचच वाटते. आज मुद्दाम अजिंठा टाईप केशरचना केलेली असते तिने. त्याचे लक्ष वेधेल, तो कौतुक करील ह्या अपेक्षेने. पण नो रेस्पॉन्स. ती एकदम नर्व्हस् होते. एक शब्दही न बोलता आत निघून जाते. त्याला मात्र कशाचेच काही नाही.

बराच वेळ तो नुसताच बसून राहतो. अगदी घुम्यासारखा. मनावर काहीतरी ओझे लादल्यासारखा. टायची गाठदेखील सैल करीत नाही. चाळा म्हणून टेबलावरील पुस्तकांच्या ढिगाऱ्यातले कुठले तरी एक पुस्तक तो चाळल्यासारखे करतो. एक दोन पाने वाचूनही पाहतो. त्याचे मनच लागत नाही. दणकन् तो ते पुस्तक टेबलावर फेकून देतो.

—ती चहाचा कप टेबलावर आणून ठेवते. "चहा ठेवलाय. थंड होईल." एवढेच सांगून निघून जाते.

कपातून निघणाऱ्या गरम वाफांकडे तो शून्यपणे पहात राहतो. बराच वेळ कप हातात घेऊन नुसताच कुरवाळतो. नि मग एकदम चहा संपवतो. आधाशा-सारखा एकाच घोटात. चहा पिऊन होताच सिगारेटसाठी तो अस्वस्थ होतो. खिसे चाचपडतो. संपलेले पाकीट मघाशीच त्याने फेकून दिलेले असते. आता बाहेर जाऊनच पाकीट घेऊन यावे लागणार? त्याची ही अस्वस्थता तिच्या लक्षात यायला वेळ लागत नाही. ती शांतपणे सिगारेटचे पाकीट त्याच्या समोर ठेवते. "ओ, थँक्स." नकळत तो म्हणून जातो. तिला कसेसेच वाटते. 'इतका तुटकपणा! ह्याला झाले आहे तरी काय?' तिला काहीच समजत नाही. तो 'अॅट ईझ्' सिगारेट शिलगावतो. त्याने सिगारेट ओढू नये, असे तिला सारखे वाटते. सांगायची हिंमत मात्र होत नाही.

सिगारेटचे एक दोन झुरके मारताच त्याला एकाएकी 'फ्रेश' वाटू लागते. तो टाय काढून फेकून देतो. बुटाचे बंद सोडू लागतो. बंद सोडता सोडताच शीळ वाजवू लगतो.

—तिला जरा मोकळे वाटते. त्याच्या होणाऱ्या हालचाली चोरट्या नजरेने बघत राहते.

तो रेडिओजवळ जाऊन रेडिओ लावतो. खरखरीशिवाय दुसरे काहीच ऐकू येत नाही. तो चिडून रेडिओ बंद करतो. आणि खिडकीतून, बाहेर खेळणाऱ्या मुलांचा खेळ पाहात उभा राहतो.

"मी जरा बाजारात जाऊन येते."

तो काहीच उत्तर देत नाही. नुसता पाहतो. ती सँडल्स् वाजवीत निघून जाते. 'घरी लवकर येवून तरी काय करायचंय' म्हणून ती परस्पर मैत्रिणीकडे जाऊन बसते.

तो घरीच बसून राहतो. त्याला कुठेच जावेसे वाटत नाही. ऑफिस आणि घर, घर आणि ऑफिस असा त्याचा ठरलेला कार्यक्रम. आपण होऊन तो कुणाकडे जात नाही. कुणी बोलावलेच तर नाही म्हणत नाही.

—खूप उशीरा ती परत येते. तो आपला अजूनही बसूनच असतो. बरोबर आठ वाजता ती त्याला बोलावते—

"पान मांडलय."

आठ वाजले की त्याला जेवायला लागते हे तिला ठाऊक असते. पाच मिनिटांचा देखील उशीर झालेला चालत नाही. उशीर झाला तर तो रागावतो. रागावतो म्हणजे काय की, काहीही बोलत नाही. कपाळावर फक्त आठ्या चढतात त्याच्या !

दहा मिनिटांच्या आतच त्याचे जेवण संपते. हेही नेहमीचेच. सण असो वार असो. आरामशीर, गप्पा मारीत, पदार्थाची स्तुती करीत तो चवीने जेवलाय असे कधी घडतच नाही. त्याची आपली सदैव घाई. नवीन नवीन तिला फार वाईट वाटायचे. आता सवय झाली आहे.

तो जेवून उठला की ती स्वत:चे ताट वाढून घेते. तो सिगारेट ओढीत आरामखुर्चीवर पडून राहतो. 'सारखे आरामखुर्चीवर बसण्याचा ह्याला कंटाळा कसा येत नाही ?' हा तिच्यापुढे कायम प्रश्न. जेवता जेवताच ती मनाशी विचार करते: 'खरोखरीच हा असा कां वागतो? ह्याला हौस-मौज कशी नाही ! कधी हिंडणं नाही. फिरणं नाही. कधी सिनेमा-नाटक नाही. जेव्हा पाहावं तेव्हा हा आपला घुम्म ! सदैव कपाळाला आठ्या. या माणसानं लग्न तरी कशाला केलं ? खुशाल संन्यास घेऊन मोकळं व्हायचं. विनाकारणच एका पोरीच्या आयुष्याचा नाश. नशीब आपलं, दुसरं काय ? ह्याला कधी काही सांगावं, बोलावं, विचारावं तर 'हु', 'अस्सं', 'बरं', या पलीकडे एक शब्दही बोलत नाही. हा माणूस आहे की राक्षस ? ह्याला इतरांच्या भावनांची कदर कशी नाही...' ठसका लागतो. ती पाणी पिते. घरातली आवराआवर करून अंथरूणावर मासिक वाचीत पडते. तो आपला बाहेर वर्तमानपत्रे चाळीत पडून आहे.

आता तो असाच बसून राहणार. रेडिओ-वरील सगळे कार्यक्रम संपेपर्यंत जागत बसणार. सिगारेटी संपल्या की खळाखळा चूळ भरून एक प्याला थंडगार पाणी पिणार नि मग झोपणार. हेही ठरलेले. यात बदल नाही. वाटते जग बदलेल पण हा बदलणार नाही.

तिला पुष्कळ पुष्कळ वाटते की, त्याच्या जवळ जावे. त्याच्या हातातील सिगारेट फेकून द्यावी. त्याच्या केसातून प्रेमाने हात फिरवावा. त्याला काय होतेय् ते विचारावे. तिला धैर्य होत नाही. तिला त्याची भीति वाटत असते. 'न जाणो आपण असे काही करायला गेलो नि तो रागावला तर. . . त्यापेक्षा नकोच–सगळे त्याच्याच कलाने होऊ दे. त्याचेच खरे होऊ दे. . .'

ती हातातील मासिक फेकून देते. डोळे मिटून नुसती पडून राहते. काही केल्या झोप येत नाही. कितीतरी वेळ... तिला वाटते, 'कदाचित् आज त्याची लहर फिरेल. . .तो जवळ येईल. . . आपल्या केसांवरून हात फिरवील. . . ओठावर हलकेच ओठ टेकवील नि मग...'

—या विचारातच तिला झोप लागते. मध्येच केव्हातरी तिला जाग येते. ती बघते. तो घोरत पडलेला असतो. अगदी शांत. निर्विकार. ती हलकेच त्याच्या जवळ जाते. अलगद् त्याच्या पांघरुणात शिरते. . .

सकाळ होते.

—तो हातपाय पोटाशी घेऊन लहान मुलासारखा झोपलेला असतो. ती त्याच्या अंगावर पांघरूण घालते नि कामाला लागते. तो उठायच्या आत सारी कामे व्हायला हवीत. चहाही तयार ठेवायला हवा. कारण उठल्याबरोबर अंथरुणावरच त्याला चहा लागतो. ●●●



## पा ठ मो री

**मी फक्त पाहिली पाठ**
**अन् मस्त जरीचा कांठ**
**होतीस ग तू पाठ–मोरी**
**बघत कुणाची वाट**
**पाठिशी झाड चांफ्याचे**
**सोबत ग तुजला मोठी**
**अन् ऊन तीनसांजेचे**
**सांगते धीराच्या गोष्टी**
**मागून येऊनि वारा**
**झांकतो बटानीं डोळे**
**फसतेस परन्तु भोळे**
**समजुनिया भलतें चाळे**
**पाहून उतावीळ तुजला**
**बघ अधीर झाली वाट**
**खोळंबून आहे बसला**
**ग सुना नदीचा कांठ**
**मी फक्त पाहिली वाट**
**अन् मस्त जरीचा कांठ**
**तुझी नि झाली नाही**
**परन्तु डोळे-भेट—**

**—ह. शि. खरात**












# तपस्वी शिल्पकार



## पद्मश्री करमरकर



**शुभशकुनाचा शंखध्वनी**

**पद्मश्री नानासाहेब करमरकर चिरंजीव झाले ते त्यांच्या शिल्पकलेतील प्राविण्य नि नैपुण्यानं. परंतु बालपणी रॉथफिल्डसाहेबांनी त्यांना हाताशी धरलं नसतं तर आपण एका थोर कलावंताला अक्षरशः अंतरलोच असतो. रॉथफिल्डनी केलेली पारख शंभर टक्के योग्यच ठरली अन् हा आंतरराष्ट्रीय ख्यातीचा कलावंत भारताला ललामभूत ठरला तो मात्र मेहनतीनं.**

**कुलाबा** जिल्ह्यातील सासवने या छोटयाश्या खेड्यात, एका काळोख्या खोलीत, ५–६ वर्षाचा एक मुलगा, गणपति बनविण्यासाठी तयार केलेली चिकण माती घेऊन, त्यांची, उंदीर, बैल, नाग वगैरे चित्रे करण्याचा प्रयत्न करीत होता. अचानक मागे वडील येऊन उभे राहिल्याने तो दचकला. कारण घरातील लहान मुलांना गणपति कारखान्याच्या खोलीत येण्याची सक्त मनाई होती. "काय रे विनायक, ही कसली चित्रे करतोस, गणपती करून बघ ना." हे अनपेक्षित उद्गार ऐकून तो छोटा मुलगा आश्चर्यचकित झाला. जे मनात होते तेच नेमके मिळाले.

सुप्रसिद्ध शिल्पकार कै. नानासाहेब करमरकर यांच्या कलाजीवनाची ही अशी सुरवात झाली. सासवन्याचे करमरकर घराणे हे एक कलाकारांचेच घराणे. गणपति करण्याचा त्यांचा पिढीजात धंदा. नानासाहेबांचे आजोबा हे एक उत्कृष्ट चित्रकारही होते. उपजीविकेचे एक साधन म्हणून चार महिने गणपति करून मुंबईला नेऊन विकण्याचा नानासाहेबांच्या वडिलांचा कित्येक वर्षांचा उद्योग होता. छोटया विनायकचेही या कलेत मन रमू लागलेले पाहताच त्यांच्या वडिलांना आनंद झाला. या मुलाला गणपति बनविणारा कलाकार करून, त्याचा संसार सासवन्यालाच थाटून द्यायचा, अशी त्यानी मनाशी खूणगाठ बांधली. त्याना काय कल्पना की हा मुलगा पुढे एक आंतरराष्ट्रीय कीर्तीचा कलाकार होणार आहे ?


**लेखक व छायाचित्रकार**

मधुसूदन फाटक


पहिली काही वर्षे छोटे मोठे गणपति करण्यातच गेली. पुढे पुढे या छोटया कलाकाराला या एकाच कामाचा कंटाळा









आला. मग त्याला नवीन छंद लागला, तो चित्र रेखाटण्याचा. घरातील ओटीच्या भिंतीवर देवादिकांची सुंदर चित्रे उमटू लागली. त्याचेही घरातील वडिल मंडळींकडून व गावातील लोकांकडून कौतुक होऊ लागले. गावातील शंकराचे देऊळ, भिंतीवर चित्रे काढून सुशोभित करण्याचे काम छोट्या विनायकाला सांगण्यात आले आणि येथेच करमरकरांच्या प्रगतीचा दरवाजा खुला झाला. कुलाबा जिल्ह्यातील एक रसिक सनदी अधिकारी श्री. ऑटो रॉथफिल्ड हे त्या सुमारास सासवने येथे दौऱ्यावर होते. त्यांनी मंदिरावर चितारलेली ही चित्रकला पाहिली आणि चित्रकर्त्याला बोलावणे पाठविले. भीतभीतच साहेबांपुढे उभा ठाकल्यावर आश्चर्याचा आणखी एक गोड धक्का या कलाकाराला बसला. तोंडभर शाबासकी आणि वर दहा रुपयांची नोट. आपल्या कलाकृतीबद्दल असा भरघोस मोबदला पहिल्यानेच मिळाल्या-नंतर किती आनंद होईल, त्याची कल्पनाच करावी. याच रॉथफिल्डसाहेबांनी करमरकरांच्या पुढील शिक्षणाची सोय, स्वखर्चाने मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये केली. मुंबईतील शिक्षण पुरे झाल्यानंतर शिल्पकलेच्या खास अभ्यासासाठी करमरकरांनी रॉथफिल्डसाहेबांच्या मदतीने लंडनच्या 'रॉयल अकादमी'त प्रवेश केला. शिल्पकलेतील प्रगत शास्त्राचा अभ्यास झाल्यानंतर भारतामध्ये परतण्या-पूर्वी श्री. करमरकर यांनी युरोपचा दौरा केला. त्यात त्याना युरोपातील, विशेषत: इटलीतील आधुनिक शिल्पशास्त्राचा जवळून परिचय झाला.

परदेशातून परतल्यानंतर नानासाहेबानी कलकत्ता येथे आपल्या व्यवसायास सुरवात केली. परंतु सुरवातीलाच, हातात कसब आहे, पण पुरेसे कामच नाही, अशी त्यांची स्थिति झाली. मानसिक विषण्णावस्थेतच त्यांनी, त्या स्थितीला साजेसा 'शंखध्वनि' हा पुतळा तयार केला. आणि हाच पुतळा शेवटी त्यांच्या व्यावसायिक भरभराटीचा शुभ-शकुन ठरला. या कलाकृतीला बरीच पदके आणि रोख बक्षिसे मिळाली. नानासाहेबांना आता भारतीय कीर्तीची बरीच कामे मिळू लागली. तेव्हा कलकत्त्याचा आपला मुक्काम हलवून ते मुंबईत स्थायिक झाले. संस्थानिकांच्या प्रेरणेने स्थापन झालेल्या छत्रपति शिवाजी स्मारक समितीतर्फे नानासाहेबांना शिवाजीचा पुतळा करण्यासाठी पाचारण करण्यात आले. आणि अल्पावधीतच पुण्याच्या भोसला मिलिटरी प्रिपरेटरी स्कुलसमोर साडेतेरा फूट उंचीचा छत्रपतींचा अश्वारूढ पुतळा उभा ठाकला. ही त्यांची कलाकृति आयुष्यातील उत्कृष्ट आणि चिरस्मरणीय ठरली. योगायोग असा की नानासाहेबांनी देवळाच्या भिंतीवर शिवाजी महाराजांचे चित्र रेखाटून आपल्या कलाजीवनाला सुरवात केली. आणि शिवाजी महाराजांचाच पुतळा बनवून कीर्तीचे शिखर गाठले. या पुतळ्याच्या उभारणीनंतर देशात शिवाजी महाराजांचा अश्वारूढ पुतळा उभारण्याची एक लाटच उसळली. त्या भव्य पुतळ्याच्या उभारणीत नानासाहेबांना अनंत अडचणींना तोंड द्यावे लागले. ब्रॉन्झ धातूचे एवढे प्रचंड ओतकाम करणारी फाउंड्री मिळणे कठीण झाले. मुंबईपासून पुण्यापर्यंतच्या ह्या पुतळ्याच्या प्रवासाचा बिकट प्रश्न उभा ठाकला. परंतु छत्रपतींच्या पुण्याईनं नानासाहेबांनी सर्व अडचणींवर मात करून, मानाचे मुजरे स्वीकारीत हा पुतळा पुण्याला आणवला.

महात्मा गांधींना प्रत्यक्ष बसवून त्यांचा पुतळा बनविण्याची दुर्मिळ संधि नानासाहेबांना लाभली. गुरुवर्य रवीन्द्रनाथ टागोर, विठ्ठलभाई पटेल, लोकमान्य टिळक या नेत्यांचे नानासाहेबांनी निर्मिलेले पुतळेही गाजले. याशिवाय कोल्हापूरचे महाराज, बडोद्याचे महाराज या धनवान संस्थानिकांकडूनही नानासाहेबांना खासगी कामे आणि त्याबरोबर सांपत्तिक स्थिरता मिळाली. स्मारकरूपी पुतळ्याबरोबर नानासाहेबांनी शेकडो जीवनचित्रांच्या कलाकृति निर्मिल्या. त्यामध्ये 'आई आणि लेकरु', 'कोळीण', 'गौळण', 'वाटसरु', 'मोरु माळी' वगैरे मूर्ति अप्रतिम झाल्या आहेत.

चेंबूर भागातील देवनार येथे एका शांत जागी कलेला पोषक अशा वातावरणात श्री. करमरकर यांचा स्टुडिओ उभा ठाकला होता. स्टुडिओमध्ये छोट्या मोठ्या कलाकारांचे अथवा रसिकांचे मनमोकळे स्वागत होत असे. करमरकरांच्या स्टुडिओला भेट



म्हणजे कलेच्या प्रांगणात दोन घटका आनंदात घालविण्यास मिळत असत. स्टुडिओच्या आवारातील श्री. फिरोझशहा मेहता व विठ्ठलभाई पटेल यांचे अतिभव्य पुतळे लावून नजरेस पडले, की आपली पावले स्टुडिओकडे झपझप पडू लागतात. प्रवेशद्वारापाशीच 'एक महिला आपल्या बालकाचे हात जोडून पाहुण्यांचे स्वागत करावयास शिकवीत आहे' अशी अप्रतिम कलाकृति पाहून आपण क्षणभर तेथेच थबकतो. स्टुडिओच्या भींतीवरच संगीतसम्राट तानसेन व संगीतसम्राट त्यागराज यांच्या जीवनातील प्रसंग कोरून रेखाटले आहेत. पुतळे आणि प्रतिमा हुबेहूब (Lifelike) दिसण्याकडे नानासाहेबांचा कटाक्ष असे. शिवाजी-महाराजांचा पुतळा करण्यासाठी एक अस्सल अरबी घोडा मुद्दाम स्टुडिओमध्ये आणून ठेवला होता. म्हैस व शेतकरी हा पुतळा करण्यासाठी एका म्हशीला मोठ्या मुश्किलीने 'मॉडेल' म्हणून बसविण्यात आले होते. या असल्या मॉडेल्सच्या गमती नानासाहेबांच्या तोंडून ऐकण्यात मोठी गंमत वाटत असे. नानासाहेबांच्या सहवासात तास दोन तास काढले म्हणजे नव्याजुन्या गप्पागोष्टी ऐकण्यास मिळत. त्यांत नव्याजुन्या कलाकारांवर परखड टीका असे. तसे उदयोन्मुख कलाकारांबद्दल उत्तेजनपर उद्गारही असत. एकादे ऐतिहासिक पुरुषाचे अथवा राष्ट्रीय स्मारक कलाकाराने बिघडवले तर त्यांचा संताप व्यक्त होत असे. तसेच राज्यकर्त्यांकडून कलाकारांची योग्य ती कदर झाली नाही तर निर्भीड टीकाही होत असे.



मुंबई, कलकत्ता या शहरात सदासर्वकाळ राहून सुद्धा नानासाहेबांना आपल्या सासवने गावाबद्दल फार अभिमान आणि कळकळ होती. पश्चिम किनाऱ्यावर समुद्राच्या सान्निध्यात नारळीपोफळीच्या गर्द छायेत वसलेले सासवने हे खेडे निसर्गरम्य असून तेथील वातावरण कलाकारांना पोषक असेच आहे. नानासाहेबांनी तेथे आधुनिक बंगला बांधला आहे आणि त्याच्यात स्टुडिओचीही सोय केली होती. नानासाहेबांच्या असंख्य कलाकृति आता येथे ठेवल्या जाणार आहेत. ग्रामसुधारणेच्या मोहिमेतहि नानासाहेबांनी अक्षरशः तन, मन आणि विशेषतः धन खर्चिले होते.

अलिकडे वार्धक्यातमुद्धा नानासाहेबांचा उत्साह तरुणाला लाजवील असाच होता. नवीन नवीन कलाकृति घडत होत्या आणि बऱ्याच भव्य कल्पना डोक्यात घोळत होत्या. अमेरिकेतील राष्ट्रीय स्मारकाच्या धर्तीवर ठाण्याजवळील पारसिक डोंगर-माथ्यात खडकामध्ये भारतीय पुढाऱ्यांचे चेहरे खोदावे अशी एक त्यांची कल्पना अखेर कल्पनाच राहिली. पद्मश्री नानासाहेब करमरकरांच्या मृत्यूने एका महान तपस्वी कलाजीवनाचा अस्त झाला आहे. देशभर ठळक जागी उभ्या ठाकलेल्या त्यांच्या कलाकृती हेच त्यांचे चिरंतन स्मारक! ●●●

[ पृष्ठ १८ वरून–लाल दिवा ]

जितेंद्रानं रागानं विनीताला विचारलं. विनीतानं एकदा नजर वर उचलून जितेंद्राकडे पाहिलं आणि ती म्हणाली, "मी कशाला तसं म्हणू ? पण . . ." आणि मग क्षणभर थांबून ती म्हणाली, "पण मला हे कळत नाही, तुम्हाला मोहनसाहेबांची एवढी असूया असण्याचं कारण काय ? तुमचे माझे संबंध अगदी निर्भेळ आहेत, असं ना तुमचं म्हणणं आहे ? एक लक्षात ठेवा मी त्यातली नाही."

"विनीता !" जितेंद्र न राहवून ओरडला. त्यावर त्याच्याकडे एक तीक्ष्ण नजर टाकून विनीता म्हणाली, "हे पहा गेल्या आठदहा दिवसात मी उगाच मार्क केलंय तुमचं वागणं ! मला एवढंच सागावसं वाटतं की, या बाबतीत तुम्ही माझ्याशी यापुढं न बोलणं उत्तम ! माझी काळजी घ्यायला मी समर्थ आहे."

विनीताच्या या बोलण्यानं जितेंद्र जणु एकदम खचला. तो आपल्या खुर्चीत बसला आणि आपलं तोंड त्यानं दोन हातात झाकून घेतलं. आपल्या कळकळीचा या विनीतानं असा अर्थ करावा याचा त्याला फार विषाद वाटला. त्याचा हा विषाद, ही खंत त्याच्या मनाला फार लागली. विनीताच्या बाबतीत त्याच्या मनात कधीही कसलीही अभिलाषा उत्पन्न झाली नव्हती आणि आज विनीता त्याला म्हणत होती, "मला माहीत आहे तुम्हाला मोहनची असूया वाटते."

या गोष्टीचा जितेंद्राच्या मनावर फार परिणाम झाला. त्यानं काही दिवस रजा घेतली आणि तो घरी राहिला. विनीतानं आपल्याविषयी हे अनादराचे उद्‌गार काढले होते याचा त्यानं सुनेत्राजवळ उल्लेखही केला नाही. सुनेत्राला या गोष्टी सांगणं म्हणजे आपण आपला झालेला अपमान तिला सांगणं अशी त्याची भावना झाली होती. तो आपल्या मनाशीच खंत करीत होता. विनीतेची पावलं वाकड्या वाटेकडे वळत होती एवढं त्याला कळत होतं. तिला वांचवण्याचा त्याचा उपाय खुंटला होता. काय होईल ते पाहण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता.

घरी रजेवर राहिल्यापासून जितेंद्राला विनीतेच्या पुढच्या हालचाली कळत नव्हत्या. त्या कळाव्या अशी उत्सुकताही त्याला नव्हती. त्याच्या मनाला लागली होती ती फक्त हुरहूर! त्या वेड्या हुरहुरीतच त्याचे दिवस जात होते. त्यादिवशीही तो असाच आपल्या घराच्या व्हरांड्यात बसला होता. सुनेत्रा बाहेर गेली होती. संध्यासमयीचा तांबुस प्रकाश पसरला होता. जितेंद्र त्या लाल प्रकाशाकडे बघत होता. सूर्य हळूहळू अस्तास जात होता आणि त्याच्या लाल तांबूस प्रकाशात आसमंत भरून राहिलं होतं. हवेत काही विचित्र कोंदटपणा आला होता आणि जितेंद्र विनीताचे विचार करीत खुर्चीत बसला होता. त्याच्या मन:चक्षूंसमोर अनेक प्रसंग चितारले जात होते आणि ते आपल्याला खरंच पहावे लागतील या भीतीनं जणू त्यानं आपले डोळे मिटून घेतले होते.

कुणीतरी येऊन जितेंद्राच्या जवळ उभं राहिल्याचा त्याला भास झाला. त्यानं डोळे मिटूनच विचारलं, "संपलं ना सारं ?"

"हो संपलं ! नाही, संपणार होतं पण——" असं म्हणून कुणीतरी एक हुंदका दिला. जितेंद्राला तो आवाज ओळखीचा वाटला. त्यानं डोळे उघडून पाहिलं. विनीता समोर उभी होती. तिनं आपलं तोंड हातानी झाकलं होतं आणि ती हुंदके देत होती. जितेंद्र खुर्चीतून उभा राहिला. त्याच्या सर्वांगावर एक विलक्षण काटा सरसरला. विनीता विकल झाली होती. ती रडत होती. याचा अर्थ . . ! जितेंद्रानं पुढे होऊन विनीताचे हात तोंडावरून दूर केले. तिच्या चेहऱ्याकडे त्यानं अगदी दृढ नजरेनं पाहिलं. त्याला फारसा अर्थबोध झाला नाही. तिला खुर्चीत बसवून त्यानं विचारलं, "काय झालं विनीता ? अशा अवेळी कां आलीस ? आणि रडतेस कां ?"

जितेंद्राचे हात घट्ट पकडीत विनीता म्हणाली, "क्षमा करा मला जितेंद्र ! क्षमा करा ! तुमचा सल्ला मी मानला नाही. फार मोठी चूक झाली माझी. मला क्षमा करा ! सांगा, कराल ना मला क्षमा ?"

आपले हात तिच्या पकडीतून सोडवीत जितेंद्र म्हणाला, "क्षमा करायची किंवा नाही हे मग ठरवू, आधी काय झालं ते सांग ! मोहननं काही कमीजास्त प्रकार केला काय ?"

आपली मान वर न करताच विनीतानं नुसता हुंदका दिला. जितेंद्र खाडकन् उभा राहिला, "म्हणजे? विनीता तुला . . . तू . . ." त्याला पुढचं नीट बोलताहि आलं नाही.

त्याचा आवेश पाहून विनीता घावरली. त्याच्याकडे पहात ती म्हणाली, "नाही, अगदी तसा प्रकार झाला नाही. पण झाला असता. विश्वासनं आणि मरलीननं माझ्यावर ती आपत्ती आणली होती. केवळ तुमच्या सद्‌भावनेनंच मी निभावले."

"सारं नीट सांग ! मला काय काय घडलं ते नीट सांग, विनीता!" जितेंद्राचं ते प्रेमळ बोलणं ऐकून विनीताला बराच धीर आला. तिनं आपले आसू पुसले आणि ती म्हणाली, "आज दुपारी, मरलीन मला म्हणाली, तू माझ्या घरी ये, आपण मोहनसाहेबांच्या घरी जाऊ. त्यांचा वाढदिवस आहे आज. विश्वास तुला न्यायला येतील. त्याप्रमाणे चार वाजता विश्वास माझ्या घरी आला, पण त्यानं मरलीनकडे न जाता आपण डायरेक्ट मोहनसाहेबांच्याच घरी जाऊ, तिथंच मरलीन येणार आहे असं मला सांगितलं. मी त्याच्याबरोबर गेले. मोहनसाहेब एकटेच घरात होते. आमची वाटच पहात होते. 'मरलीन अजून आली नाही, तिला घेऊन या' असं त्यानी विश्वासला सांगितलं. विश्वास गेल्यावर मी आणि मोहन दोघं बाहेरच बोलत बसलो. मध्येच एकदम आठवण झाल्यासारखं करून तो म्हणाला, "विनीता जरा आत जाऊ या का ? बटलर ओव्हन लावून गेलाय तो बघितला पाहिजे."

"मग आत गेलीस तू ?" जितेंद्रानं मध्येच विचारलं.

"हो ! मी आत गेले. दोन तीन खोल्या ओलांडून आम्ही आत आलो.

अनुक्रमणिका








मी वाकून ओव्हनकडे पहात होते आणि . . . " विनीता बोलताना थांबली. तिची सारी काया थरथरत होती. जणु तो प्रसंग ती आता या क्षणी अनुभवीत होती. जितेंद्रानं हळू हळू तिच्या पाठीवर थोपटलं. तिला थोडा धीर आला. ती पुढे म्हणाली, "आणि, आणि मोहननं मला एकदम आपल्या बाहुपाशात घेतलं. मी ओरडले, असेल नसेल तो जोर करून त्याला ढकलून दिलं. तो उठून परत माझ्या बाजूनं येत होता. मी हातात आलेला चिमटा त्याच्या तोंडावर फेंकला. त्यानं 'आईऽ ग' असा आर्त आवाज काढलेला मी ऐकला आणि त्याला तसाच ओरडत ठेवून मी बाहेर पडले. बाहेर मरलीन आणि विश्वास बसले होते. असे बसले होते की त्यांच्याकडे पाहून मला किळस आली. मला पाहून मरलीन हंसली, पण तिच्याकडे तिरस्कारानं पाहून मी घराची वाट धरली. खरंच सांगते जितेंद्र केवळ तुमच्या इच्छाशक्तीमुळेच मी आज बचावले. चुकले मी, मला क्षमा करा !"

जितेंद्रानं हसून तिच्याकडे पाहिलं. तो म्हणाला, "वेडे, हा क्षमा करण्या न करण्याचा प्रश्न नाही. तू बचावलीस, माझं काम झालं. तुझी मला नेहमीच काळजी वाटत होती. तुझ्यासारखी स्त्री त्या कपट-जाळ्यात कशी सहज गुंतली होती हे पाहिलंस ना? वेळोवेळी धोक्याचा लाल दिवा दाखवूनही तुला बोध होत नव्हता. दैवानं खैर केली. एक कुटुंब बचावलं."

"पण आता याला शासन करायला हवं असं नाही तुम्हाला वाटत? हे असले नराधम समाजात वावरतात, त्यांचा नि:पात करायला हवा !"

"खरं आहे तुझं म्हणणं ! पण ती गोष्ट आज तुझ्या माझ्या हातातली नाही. त्याच्यामागे फार मोठी यंत्रणा उभी आहे. आपण त्यात सहज भरडले जाऊ ! कुणीही आपलं ऐकणार नाही."

"मग आता यावर उपाय ?"

विनीताच्या त्या प्रश्नावर जितेंद्र हसला. आणि त्यानं एक कागद घेतला, आपला राजीनामा लिहिला. आणखी एक कागद घेतला, त्यावर तसाच मजकूर लिहिला आणि विनीताला म्हणाला, "याच्यावर सही कर ! या धोक्याच्या वाटेन न जाणं एवढंच आपल्या हातात आहे. दुसरी गोष्ट, या प्रकारानंतर तुला तिथं सुखानं राहता येणार नाही. आणि आता यापुढे आणखी तिथं राहण्याची माझी इच्छा नाही. असले प्रकार वारंवार घडलेले पाहणं मला शक्य नाही.

विनीता यावर काही बोलली नाही. जितेंद्रानं पुढे केलेल्या कागदावर तिनं सही केली. जितेंद्रानं दोन्ही पत्रं निरनिराळ्या पाकिटात घातली आणि ती बंद केली. त्यानं वर पाहिलं चंद्रबिंब हळुहळू वर येत होतं.

• • •













# स्मृती ठेवुनी जाती....

माणसे येतात, राहतात आणि ठरलेल्या दिवशी ह्या सृष्टीच्या रथातून अलगद खाली उतरतात. आल्या वाटेने निघून जातात. ती आली वाट त्यांनाही नीट ठाऊक नसते. पण चालायला लागतात ती मात्र त्याच अचुक वाटेने. कुठून आली आणि जाणार कुठे ? हे प्रश्न एखाद्या कवीलाच सुचतात असे नव्हे. इथे आलेल्या प्रत्येकच माणसाला थोडया फार प्रमाणात ते सतावीतच असतात. पण ह्या दोन प्रश्नांच्या मधे उरते ती ही दुनिया. याने माणसाचे लौकिक जीवन त्या वाटेवर जी माणसे निश्चित पावले टाकीत जातात. जाताना भूमीला 'कनकिता' करून सोडतात. स्वतःच्या मज्जेची फुले ह्या काटेरी मार्गावर पसरून हे काटेरी मार्ग सह्य करतात. तीच माणसे ह्या सृष्टीला भूषण-भूत ठरतात. ती स्वतः तर मोठी होतातच. पण त्यांच्या गौरव-शाली जीवनाने अवघे जीवनच ते उजाळून टाकीत असतात.

अशा माणसांना जग प्रतिभावंत म्हणते.

असाच एक प्रतिभावंत कलाकार ३० मे १९६८ ला अचानक-पणे काळाच्या अतुट उतरणीवरून वेगाने धावत चाललेल्या रथातून खाली उतरला आणि आल्या वाटेने (म्हणजे कुठे ?) निघून गेला. त्या प्रतिभावंत कलाकाराचे नाव होते सावळाराम लक्ष्मण हळदणकर !! ही माणसे काही नाव घेऊन येतात वा त्यांच्या घरची माणसे त्याना नावे ठेवतात. पण नाव ठेवणे आणि नाव कमावणे, गाजविणे ह्यात फरक आहे. हळदणकर हे नाव 'जलरंगातील एक जादुगार वा किमयागार' म्हणून अमर राहणार आहे. लौकिक नावाच्या पलिकडे ही प्रतिभेची नावे असतात. आणि हळदणकर एक 'तृप्त गृहस्थ' कुणाचा तरी पती, पुत्र वा पिता' ह्यापेक्षाही चित्रमहर्षी! हळदणकर हे अवघ्या जगाशी, रंगांशी, सृष्टीशी जोडलेले जे नाते आहे ते अधिक टिकणार आहे. हा 'चित्र-वंश' कधीही खंडित होणार नाही, कारण त्याचे नाते सृष्टीतल्या चराचराशी जोडले गेले आहे. हळदणकर एक मित्र, शेजारी, गृहस्थ, सुजन संसारी, निःस्वार्थी गुरु इत्यादि इत्यादि होतेच. सत्यता आणि चारित्र्या-वर त्यांची श्रद्धा होती. ते म्हणत "तुम्ही नेहमी सत्यच बोलत गेला तर एक वेळ अशी येईल की जेव्हा तुम्ही बोलाल ते सत्य होत जाईल." कलेच्या क्षेत्रात द्वेष, हेवेदावे, पंथबाजी पुष्कळच आढळते. पण त्याचा वारा ह्या सत्वपुरुषाला कधीही लागला नव्हता. कुणाचा द्वेष नव्हता. उलट दातृत्व होते. हा माणूस कला देतच राहीला. पैशांची गणिते त्यांनी कधी मांडली नाहीत. अशी गणिते न मांडणाऱ्याच्या मागे पैसा जातो, तसा तो भाऊ-साहेबांच्या मागेही गेला. प्रसंगी स्वतः मागे राहून येणाऱ्या पिढीला स्वतःजवळचे जे जे उत्तम आहे ते ते देत राहिले. आणि हा दातृत्वाचा वसा त्यानी अखेरपर्यंत सोडला. नाही, शेवटी शेवटी दृष्टि क्षीण झाली होती. कमी ऐकू येत होते. पण हा माणूस तृप्तच होता. मुलगा गजानन उत्तम चित्रकार झाला. मुलगी चित्रकार झाली. एक मुलगा संगीतज्ञ झाला. कलेच्या क्षेत्रातले अनेक बहुमान चालत आले. अखिल भारतीयच नव्हे, तर जागतिक कीर्ति मिळाली. 'अजोड, अद्वितीय' अशी विशेषणे जलरंगातल्या पोर्ट्रेटस्‌बद्दल व निसर्गचित्रांबद्दल लावली गेलेली कानी पडली. आज नामवंत म्हणून गणल्या गेलेल्या व्ही. जी. कुलकर्णी, बी. व्ही. व एम्. व्ही. वाघ, व. र. आंबेरकर, द. ग. गोडसे, सुशीला मंगळदार, बाळ ठाकरे, माधव सातवळेकर, बाबूराव सडवेलकर, आदी मर्झबान ह्यासारख्या कर्तृत्वशाली शिष्यांचे 'गुरुत्व' लाभले. इटालियन विश्वकोशात "जलतरंगातील जगातील तीन उत्कृष्ट कलावंतापैकी एक" असे गौरविले जाण्याचे भाग्य लाभले. मॉस्कोच्या चित्रालयात कायम म्हणून काही चित्रे लागली ह्यापेक्षा थोर भाग्य ते कोणते ? ही सारी भाग्ये ह्या कर्तृत्वशाली माणसाने स्वतःच्या कुंचल्याच्या किमयेने खेचून आणली. स्वतःची संस्था चालविली व मग स्वतःच एक संस्था बनले. आर्ट सोसायटी ऑफ इंडिया, महाराष्ट्र चित्रकार मंडळ आदि संस्थांचा व त्यांचा घनिष्ठ संबंध होता.

हळदणकरानी अनेक जलरंग व तैलरंगातली व्यक्तिचित्रे रेखाटली. निसर्गातही त्यांनी अनेक किमया करून दाखविल्या. पण 'जलरंगाचे किमयागार' हेच त्यांचे बलस्थान होते. संगीत हा त्यांचा फार आवडता विषय होता. विलायत हुसेन खाँ, फैयाज खाँ, मोघूबाई, अजमत हुसेन, रविशंकर वगैरे कलातपस्वी माणसे हळदणकरांच्या कलालयात हजेरी लावून जात असत. चित्र आणि संगीत ह्या क्षेत्रातल्या मूर्तिमंत सौंदर्याचे ते संमेलन मोठे आल्हादक असे, असे जाणकार सांगतात. ते सहृदय होते. मायाळू होते. त्यामुळे गरीब पण गुणी विद्यार्थ्यांना ते आपल्या घरी ठेवून घेऊन कला शिकवीत असत. त्यांचे कलालय म्हणजे एक मोठे कुटुंबच होते. कर्ता पुरुष होते भाऊसाहेब हळदणकर ! आज एका मोठ्या कुटुंबातला कर्ता पुरुष अचानकपणे निघून गेला आहे. कलेच्या कुटुंबातलाही एक समर्थ किमयागार आज निघून गेला आहे. गजानन परंपरा चालवतील असा विश्वास वाटू लागला आहे. तरीही भाऊसाहेब हळदणकर हा जलरंगातला जादूगार निघून गेला ही खंत वाटत राहीलच. माणसे येतात. राहतात. जातात. पण नुसतीच जात नाहीत "स्मृती ठेवुनी जाती" मातीत माती मिसळून जाते. पण त्या मातीने घडविलेल्या कलामूर्ति मात्र राहतात. राहतील. कै. भाऊसाहेब हळदणकर यांच्या प्रेरक स्मृतींना अभिवादन करतो.

—संपादक



अनुक्रमणिका



# एक झपाटलेला माणूस चं. वि.

आलमगीर साप्ताहिकाचे संपादक आणि मराठी वृत्तपत्र व्यवसायातील एक ज्येष्ठ पत्रकार श्री. चं. वि. बावडेकर यांचा षष्टयब्दपूर्ती समारंभ प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली अलीकडेच जाहीरपणे साजरा झाला. श्री. बावडेकर यांच्या कुटुंबाशी दीर्घकालीन स्नेहसबंध असलेल्या सुप्रसिद्ध लेखिका कु. योगिनी जोगळेकर यांनी ही व्यक्तिरेखा त्या प्रसंगाला अनुसरून लिहिली असल्यामुळे आम्ही ती प्रसिद्ध करीत आहोत.

**"तुमची** कथा पसंत असून विविधवृत्तातून लवकरच प्रसिद्ध होईल."

—सही होती 'चं. वि. बावडेकर'. त्या दोन ओळी वाचून मला स्वर्ग दोन बोटं उरला. बऱ्याच वर्षांपूर्वीची गोष्ट. माझी पहिली वहिली कथा विविधवृत्तासारख्या मातब्बर साप्ताहिकाने स्वीकारलेली वाचून मी बहोत खूष झाले. नवोदितेचे लिखाण –(कधी कधी न वाचताही) साभार परत न करता प्रकाशात आणणाऱ्याना मनोमन शतशः धन्यवाद दिले आणि कॉलेजला सुट्टी पडल्यावर आवर्जून मुंबईला जाऊन या रसिक संपादकाना जातीने जाऊन भेटावयाचे ठरवले.

त्याबरोबरच 'आलमगीर' या टोपण नावाने लिहिणाऱ्याची लेखणी जवळून बघण्याची –महाविद्यालयीन विद्यार्थिनीला साजेशी उत्सुकताही होतीच.

सुट्टीत पुण्याहून मुंबईला गेल्यावर पत्ता काढून विविधवृत्ताच्या कचेरीत गेले. बाहेरच्या खोलीत एकजण प्रुफे तपासत होते. त्याना विचारले—

"बावडेकर आहेत?"

"आहेत. त्या पार्टीशनच्या पलीकडे."

"आणि आलमगीर?"

"तेही आहेत. पार्टीशनच्या पलीकडेच".

साधं लाकडी पार्टीशन, पण मला त्या क्षणाला चक्क पोलादाचं वाटलं.

"काही खूण?" मी धाडस केले.

"चष्मा लावलेले. जा ना आत."

मी हलकेच दारावर टक्टक् केलं.

'यस्–कम इन"—रुकार आल्यावर आत गेले, आणि दिङ्मुढ झाले.'

कारण आत मेजाभोंवती गंभीर चेहरेवाले चौघेजण बसले होते. पण चौघेही चष्मेवाले! आता आली का पंचाईत! तरीही मी खडा टाकला—

"मी योगिनी जोगळेकर—"

"वा—म्हणाले आमची लेखिका–"

कुणीसे म्हणाले (कोण जाणे! चार चष्मेवाल्यांपैकी नेमकं कोण!)

"छोटी लेखिका"—मी पुस्ती जोडली.

"आजची छोटी—उद्याची मोठी."

पुन्हा मेजावरून दुरुस्ती आली. मी स्वतःला गुरफटून घ्यायला आले नव्हते. मी चटकन प्रश्न केला—"मी पुण्याहून आलमगीरना भेटायला आले होते. आपल्यापैकी आलमगीर कोण?"

"कुणीही!" मिष्कील स्वरात उत्तर आले.

"आणि बावडेकर?" मी दुसरा खडा टाकला—"कां तेही–कुणीही–" होय. तसं म्हणायला हरकत नाही. "पण आता माझ्याशी बोला."

—चौघांपैकी एकजण म्हणाले.

श्री. चं. वि. बावडेकर यांची पहिली ओळख ही अशी झाली.

ते सहकाऱ्यांशी कसे अनन्य असतात—शरीराने बहुसंख्य असले तरी कार्याशी कसे एकरूप असतात–त्याचा पहिला स्मरणीय प्रत्यय आला. कै. रामभाऊ तटणीसांनी – त्या रत्नपारख्याने – केवढी अष्टपैलू रत्ने अवती भवती जमा केली होती–तेही समर्थपणे जाणवले.

संगीतातच नव्हे तर संगतीतही चांगला गुरू असावा लागतो हेच खरं. तटणीसांनी दिलेली तालीम मुळीच वाया गेली नाही. पलाटा नुसता घोटला गेला नाही तर हाडीमाशी भिनून गेला.

वृत्तपत्रीय व्यवसायावर नव्हे तर जे जे कार्य ते ते हाती घेतात त्याच्या

योगिनी जोगळेकर








सिद्धीप्रित्यर्थ हाच अभिनिवेश—हीच जिद्द हीच त्यागाची भावना ओथंबलेली आढळते.

साहित्यसंघाच्या इमारतफंडासाठी वणवणताना त्याना चोवीस तासांचा दिवस लहान पडत होता. वेळीअवेळी जेवणासाठी दिलेली पाच मिनिटेही वाया गेलीशी वाटत होती. सूर्याच्या वटारल्या डोळ्यांची तमा नव्हती! —पर्जन्याच्या झोडपत्या हातांची पर्वा नव्हती ! आसनी —शयनी—स्वप्नी—भोवती—अहो येता जाता . . . . नाटचगृहाच्या कल्पनेनेच ते झपाटलेले होते, त्या एकाच कल्पनेत लपेटलेले होते. त्यांची ती जीवापाड मेहेनत पाहून कुणीसं त्याना विचारले—

"अशी रित्या पोटी भिक्षांदेही करण्यापेक्षा एखादा लक्षाधीश मासा गळाला लावा की".

"माझ्याबरोबर इतर कार्यकर्तेही जिवाचं रान करताहेत की! आणि हे पहा एका कोटचाधीशाने दिलेल्या लाख रुपयांपेक्षा लाखांनी दिलेला एक रुपाया मला मोलाचा वाटतो. एका मराठी माणसापेक्षा लाख मराठी माणसांनी बांधलेलं नाटचगृह अधिक नेत्रदीपक नाही का?"

—बावडेकरांचा सडेतोड सवाल आला.

अशी लाख माणसं जोडण्याच्या खटपटीत बावडेकर असताना घरी त्यांची लाखमोलाची पत्नी—उशीराबद्दल मनातल्या मनात सुद्धा लाखोली न वहाता—घरात कोडयाचा मांडा करताना मी पाहिली आहे; ही खऱ्या अर्थाने 'सहधर्मचारिणी'—पतीच्या मुंगीच्या गोताचे साखरेने स्वागत करत आलेली आहे. ध्येयाने झपाटलेल्यांची सम जाणून ती देणं—त्यांचा ताल बिघडू न देणं हे केवळ असामान्य स्त्रीच करू जाणे !




स्वतःच्या जगातच नव्हे तर माणसांच्या जगातही बावडेकर उदारमतवादी आहेत. जशी लेखणी—तशीच करणी, म्हणूनच धाकटया कन्येचा आंतरप्रांतीय विवाह त्यानी प्रेमळ सासऱ्याच्या इतमामाने साजरा केला. गोजिरा मानला.

अग्रलेखात प्रतिपक्षावर चढाई करताना खड्गाच्या धारेने तुटून पडणारी बावडेकरांची लेखणी कोमल विषयावर लिहिताना कुसुमकोमल झालेली मी पाहिली आहे. उदाहरणार्थ, गाण्याच्या मैफलीवरचा त्यांचा डोळस अभिप्राय. कारण राजकीय मतप्रणालीना टक्कर देताना हा माणूस पहाडासारखा टणक असला तरी रुक्ष नाही! अंतरी कला प्रीतीचे झरे पाझरत असतात. म्हणूनच संगीताचा हा दर्दी माणूस मैफलीत धुंदफुंद झालेला——हळवा झालेला——पापणी ओलावलेला . . . प्रसंगी स्वतःला हरवून बसलेलाही — मी बघितला आहे.

म्हणूनच नवोदित लेखकाइतक्याच अगत्याने नवागत गायकाचेंही ते स्वागत करतात. हे स्वागत मी स्वतःच अनुभवलं आहे. संघाच्या नव्या इमारतीच्या व्यासपीठाचे काम अर्धेमुर्धे असताना—एका कालिदास जयंतीला मी नेमकी मुंबईस असताना —त्या वास्तूवर—प्रि. बी. आर. देवधर, श्री. दाजी भाटवडेकर, श्री. श्यामकांत गोखले, डॉ. भालेराव, समतानंद गद्रे आदि„ रसिकाना आवर्जून बोलावून—त्यावेळी गाण्यानं नि वयानं. छोटचा असलेल्या या योगिनीचं आत्मीयतेनं गाणं केलं—त्याची स्मृती स्मरणसाखळीतून कधीच निसटणार नाही.

ते अर्धेमुर्धे व्यासपीठ आज भरभक्कम झाले आहे. या थोरांच्या आशिर्वादाने माझं अर्वकच्चं गाणंही कधीतरी भक्कम होईल असा विश्वास वाटतो.

असे हे रासक—मार्मिक 'चं. वि.' कधीकधी आपल्याबरोबर गप्पा मारत असतात—हास्यविनोद करीत असतात. चहाचिवडा खात असतात—पण—— चष्म्याच्या आतली त्यांची नजर मधेच केव्हातरी अंतर्मुख होते—हातावरच्या गप्पातून जीभ जशी मैलभर लांब जाते—तेव्हा प्रकर्षाने जाणवते की—

हा चारचौघांसारखा—चाकोरीतला साधासीधा माणूस नव्हे, तर ध्येयाने वेडावलेला—झपाटलेला माणूस आहे. कट्टचा वैष्णवाला जसे "जिकडे तिकडे अवघा झाल गोविंदु गोपाळु"—होते तसेच यांचे! म्हणूनच थोरल्या जामातांकडे गोमंतकाची सृष्टी पहातानाही ते 'आलमगीर'ची दृष्टी विसरत नाहीत. लाडक्या नलूकडची लेकीकडची विश्रांतीही टोचते अन् मग 'त्रिभुवन रोड' वरच्या आलमगीरच्या कचेरीत 'त्रिभुवन' साठवलेले बावडेकर चक्क मुसापुरीकडे निघून येतात.

बाकी या झपाटलेल्या माणसाची धुंदी उत्तरविणारे यांत्रिक आहेत. मोठे नव्हे छोटे. पण भारी हातगुणांचे. घट्ट मनाने लठ्ठ पुस्तके वाचणाऱ्या त्यांचाच नव्हे तर त्यांच्या चष्माचाही हे यांत्रिक बंडखोरपणे कबजा घेतात तेव्हा मात्र त्यांच्यातला संपादक अंतर्धान पावतो, ध्येयवेडा विरघळतो—आणि शिल्लक रहातात ते नातवंडांवर आभाळभर माया करणारे आजोबा! मला मात्र दूरध्वनीवरून आलेली दिल्लीची बातमीही ते कानावाहेर टाकतात व चिमुकल्या 'मुक्ता'शी कानगोष्ट करतात—इतकी गोड की मुक्तानेच नव्हे तर एकाद्या जीवनमुक्तानेही ती जीवाचे कान करून ऐकावी !

• • •


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



रेडियोवरून, वर्तमानपत्रातून उठता, बसता नियोजनाचा प्रचार करणाऱ्यांना जेथे रेडिओ ऐकले जात नाहीत व वर्तमानपत्रांची दखल घेतली जात नाही, तेथे किडा-मुंगीप्रमाणे वाढणाऱ्या या जनसंख्येची कल्पना आहे का ! या आडगावी ह्या प्रचार अरण्यरुदन ठरत आहे. हातातोंडाची कशीतरी गाठ पडण्यासाठी सारं कुटुंब राबत होतं, तरी पुरं पडत नव्हतं. इतकं दुर्भिक्ष्य असताना मिशनऱ्यांनी त्यांना हाताशी धरलं नाही, तरच नवल ! या साऱ्यांनी रोमन कॅथलिक पंथाची दीक्षा घेतली होती. कारण काय तर म्हणे दरडोई दोन किलो गहू मिळतो. त्या भिक्षेसाठी यांनी घेतली दीक्षा !

मायबाप मिशनरी पाठीशी असताना या मायबापांनी कुटुंब-नियोजनाची पर्वा कां म्हणून करावी ?

ही इतकी मुलं या पालकांना कशी सळो की पळो करून सोडीत असतील. अहोरात्र भांडणतंटे, आरडाओरड, गोंधळ होत असेल, मुलांवर खेकसून त्या बापाचा गळा दुखत असेल, एखाद्याचं बकोटं धरून त्याला फरफटत असेल, ज्याला थोबाडायचं त्याची ओळख न पटून भलत्यालाच थोबाडत असेल किंवा तोच मुलगा दोनदा बडवला जात असेल, इत्यादी शंकाकुशंकानी मन हैराण झालं.

"घर में दो बच्चे, होते हैं अच्छे" असा आपण याच्याजवळ प्रचार करावा. किंवा ह्याच्या घरातील परिस्थितीचं हृदयविदारक चित्र रंगवून एखादी लघुकथा लिहावी किंवा एखादी सणसणीत एकांकिका लिहून प्रचारकांकडे पाठवावी म्हणजे प्रचारकार्यास हातभार लागेल, हा लोककल्याणाचा विचार स्वस्थ बसू देईना.

दिवसा त्या मुलांचा बंगलाभर धुडगूस चालू असे. व मी तो निमूटपणे चालू देई. तेवढीच मानवाची चाहूल. एरवी सर्व निर्जन ! चौकीदाराचा तो कबूतरखाना रात्री आपल्या खुराडयात शिरे. व त्या अजस्र बंगल्यात भयाण शांतता नांदे. लावताना दारे-खिडक्यांचे आवाज घुमत. स्वतःचाच पदरव त्या नीरव शांततेत भयंकर वाटे. आपल्याच पावलात, दुसऱ्या कुणाची तरी चाहूल येऊन, भीतीनं अर्धा जीव होई. रोज असा मुठीत जीव घेण्यापेक्षा चौकी-दारालाच रात्री झोपायला बोलावण्याचा विचार आला. त्याप्रमाणे तो आला. पण एकटा नव्हे. सहकुटुंब सहपरिवार ! यांच्या पैकी दोघा दोघांना एकेका खोलीत झोपवलं तरी सारा बंगला व्यापेल, असा एक विचार आला. त्यापूर्वीच ती सारी झोपली बाहेर व्हरां-ड्यात, एका फाटक्या सतरंजीवरच एकमेकांना बिलगून !

बरोबर ट्रान्झिस्टर नेण्याची माझी परंपरा यावेळी तो बिघडल्या-मुळे खंडित झाली होती. कितीतरी दिवसांपासून अभिजात संगीत कानी पडलं नव्हतं. माझ्या आवडत्या रागांना मी मुकले होते. अभिजात संगीतातले अभिजात रीतीने गायिलेले राग ऐकले, की मला त्या रागांची सोबत वाटते. त्या अदृश्य स्वरात दडलेली एकेक रागमूर्ति आपल्या व्यक्तित्वासह साकार होऊ लागते व त्या व्यक्तित्वाची जबरदस्त पकड मनावर राहते. इकडे आल्या-

***वादक तोच, राग तोच, पण ते रूप न्यारं, हे न्यारं ! त्या भैरवीत सलगी होती, आज विलगता होती. ते मीलन होतं, ही जुदाई !.... वादकाची साधना, सामर्थ्य आज प्रतीत होत होतं...***

---

पासून रोजचा रियाजही सुटला होता. त्यामुळे सगळीकडून स्वरांची उपासमार झाली होती अन् अचानक त्या रात्री माझ्या कानावर सूर पडले. . . .

भैरवीचे ! कोण गातंय् ही भैरवी ? माझी पावलं त्या स्वरांच्या रोखानं पडू लागली. त्यावेळी ती मध्यरात्र, मोठमोठ्या हॉलमधील ती भयाणता. काही काही मला जाणवलं नाही. माझ्या जगात स्वरां-खेरीज इतर कशालाही स्थान नव्हतं. स्थान होतं ते फक्त त्या भैरवीच्या स्वरांना !

सारे मधले हॉल ओलांडून मी शेवटी बाहेरच्या दाराकडे गेले. व्हरांड्याकडे पाहिलं अन् माझा स्वतःच्या डोळ्यावर, कानावर विश्वास बसेना.

ते सूर आळवीत होता तो चौकीदार ! त्याचा मुलगा नंबर नऊ किरकिर करीत होता. तो त्याला थोपटत होता प्रेमभराने ! गात होता. शब्दांचा अपभ्रंश होता. महत्प्रयासानं मी शब्द शोधून काढले. . .

"कुंजवनी रमला, कृष्ण सावळा
संगे गोपाळांचा मेळा, वैजयंती माळ गळा
शोभे त्या घननीळा, काय सांगू त्याची लिळा
माझं भरलं गोकुळ, कृष्णकन्हैय्या सांभाळ"

एकमेकांना खेटून वेडीवाकडी झोपलेली ती मुलं! तो कौतुकाने पहात होता. कुणाला कुरवाळीत होता, कुणाचे पापे घेत होता, कुणाला पांघरूण घालीत होता, मजेत गात होता, स्वरांच्या दुनियेत मस्त होता. संसाराच्या चिंता त्याच्या गावीही नव्हत्या. शब्दांचा अपभ्रंश असला तरी स्वरांची सच्चाई होती, आवाजात लोच होती. गळ्यात फिरत होती. अगदी भिंगरीसारखी !

देवाची दुनिया अन् दैवाची लीला अजबच खरी ! "उधो ! कर्मनकी गति न्यारी !" एरव्ही या चौकीदाराच्या जीवनात स्वरांना काय स्थान होतं ? याला इतका सुंदर गळा देऊन ईश्व-रानं असा अपव्यय कां केला होता ? या 'रोमन कॅथलिका'जवळ रात्रीच्या वेळी ही भैरवी कां येत होती ? सारंच गूढ ! अगदी अनपेक्षित स्थळी, अनपेक्षित काळी व अनपेक्षित गळी अशी ही भैरवी मला भेटली व तिनं मनात कायमचं घर केलं !

या भैरवीला असंच अनपेक्षित काळी, अचानकपणे भेटण्याची नित्याची सवय आहे. माझी एक जिवलग मैत्रिण आहे. लहानपणी आम्ही एकमेकीकडे रहायला जात असू. ती आपल्या वडिलांना काका म्हणे, तसंच मी पण म्हणे. या काकांनी माझ्यावरही अगदी पितृतुल्य प्रेम केलं. मुलीच्या मैत्रीच्या दुव्याखेरीज आणखी एक दुवा












# भैरवी

--सौ. यमुना शेवडे



**रागाचा** समयाशी संबंध असावा की नाही, विशिष्ट वेळी विशिष्टच रागाचं गायन नियत केलं त्यामागे असणारं तत्त्व किंवा निकष कोणते हा एक संशोधनाचा विषय! पण विशिष्ट वेळी, विशिष्ट स्थळी गायिलेला राग कायमचा मनात ठसला व त्या राग-विषयीचं ते साहचर्य मनात रुजलं असं माझं भैरवीच्या बाबतीत झालं. ही जी भैरवी मी ऐकली ती मैफलीत नव्हे किंवा उस्तादाच्या तोंडूनही नव्हे.

आम्ही चिखलदऱ्याला गेलो तेव्हाची गोष्ट! एके काळी असणारं फॉरेस्ट रेस्ट हाऊस किती जंगी व भव्य असू शकतं याची कल्पनाच केलेली बरी! मधलं जेवणघर व बैठक यातील पडदा बाजूला सारला तर एक विस्तीर्ण सभागृह होईल इतकं विशाल! समोर अफाट बगीचा व भोवताली घनदाट अरण्य! शहरापासून, मनुष्यवस्तीपासून एकीकडे असणारं ते रेस्ट हाऊस! "सारं कसं शांत शांत" हवं याच्या हव्यासानं शांतीच्या शोधार्थ आम्ही तेथे आपले बस्तान जमवलं खरं! पण रात्रीच्या नीरव शांततेत जरा खुट्ट झालं की सरसरून काटा उठे! मनात सदैव रुखरुख असे. शांततेच्या नादी लागून अशांती पदरी आली ती अशी!

शेवटी तेथील चौकीदाराच्या कुटुंबाची मदत घेण्याचं ठरवलं. त्याची बायको काम करण्यासाठी येई. आईच्या बरोबर एखाद मुलगी, मुलगाही येई. रोज नवे चेहरे! आजचा चेहरा उद्या नाही. हा काय प्रकार? एक दिवस तिला विचारलं, "यातली तुझी मुलं कोणती?"

"एक ही तान्ही, अन् माझ्याबरोबर कामाला येते ती दुसरी. एक मुलगा पाण्याला गेला अन् एक दळण घेऊन गेला तो दुसरा. एक मुलगी लग्न होऊन घरी नांदते अन् एक मुलगा आपल्या बायकोला घेऊन वेगळा राहतो तो दुसरा. एक मुलगा माळ्याच्या हाताखाली काम करतो व एक घरी स्वयंपाक करते आहे ती दुसरी. एक शाळेत गेला व साहेबाच्या बंगल्यात काम करतो तो दुसरा...."

सर्व कामांची उजळणी केली, दोन दोन बोटं धरून बेचा पाढा म्हटला. दाही बोटं संपली. पुन्हा अकरावं बोट धरलं. "अन् काय सांगू बाईजी! तान्हीच्या वरची सोनी गेल्या वर्षी त्या टाक्यात बुडून मरण पावली. माझी सोन्यासारखी पोर" म्हणून ती बाई रडायला लागली. प्रयत्न करूनही मला तिच्या दुःखात सहभागी होता येईना. बारा मुलांना जन्म देण्याचा काळ आहे का हा?

आम्हाला बद्ध करणारा होता. संगीताचा! अभिजात संगीतावर त्यांचं निरतिशय प्रेम ! अधून मधून सतारीवर सफाईने हात फिरे. रागांची जाण, स्वरांची पहचान छान होती. उत्तमोत्तम मैफली त्यांनी ऐकल्या होत्या. अनेक उस्तादांच्या संगतीचा रंग चाखला होता. संगीतावरील अनेक ग्रंथ त्यांनी जमवले होते. त्यांच्याकडे गेलं की गायकांच्या व गायनांच्या रसील्या चर्चांची अगदी पर्वणीच असे. वेळेचं भान रहात नसे. असा स्वरात रंगलेला जीव !

दीड दोन महिने बाहेर गावी राहून मी परतले होते. व आल्यावरोबर त्यांच्यावर कोसळलेल्या पत्निवियोगाच्या आपत्तीची बातमी कळली. त्यांच्याकडे जाणं जरूर होतं. हिंमत होत नव्हती. मला पाहून त्यांची काय प्रतिक्रिया होईल ? त्यांचा बांध फुटेल. ते कोसळतील ! त्यांच्यासारख्या वडीलधाऱ्या व्यक्तीला मी काय दिलासा देणार ? कसा देणार ? मी काय बोलू ? मला बोलणं सुचेल का ? सुचलं तर शब्द उमटतील का? काय करावं ? कसं जावं ? शेवटी दबकत दबकत गेले, बैठकीत पाऊल ठेवलं व हळूच थबकले !

आतून सूर येत होते. कोण वाजवत होतं ? माझा विश्वास बसेना. ते काका होते. भैरवी छेडली जात होती. अगदी 'मनमानी' ! स्वर-झंकारात झोकदारपणा होता. झणत्कारात नूपुर होते. ठुमकत ठुमकत एकेक पाऊल टाकत भैरवी पुढे येत होती . . . . स्वरास्वरात सलगी होती. नववधूनं नव्या संसारात पदार्पण करण्याची नवलाई ! मीलनाची घाई ! हळूच बुरखा बाजूला सारला जातो त्यावेळी नवयुवतीनं मारलेला तो मुरका ! . . .

संसारचित्र स्वरातून रेखाटलं जात होतं. काका त्या चित्रात रंगले होते. त्यांच्या त्या रंगाचा बेरंग करणं माझ्या जीवावर आलं व मी हळूच काढता पाय घेतला.

नंतर एकदोन दिवसांनी गेले. कानावर विश्वास बसेना. लांबूनच कळलं की सतार छेडली जात आहे. आज पुन्हा भैरवीच ? मी मंत्रमुग्ध होऊन ऐकत होते. वादक तोच, राग तोच पण रंग सर्वस्वी वेगळा. वादकाची साधना, सामर्थ्य आज प्रतीत होत होतं. ते रूप न्यारं ! हे रूप न्यारं ! त्या भैरवीत सलगी होती. आज विलगता होती. ते मीलन होतं. ही जुदाई होती. चिरविरह ! विहरिणी भैरवी विरहिणी, विराणी बनली होती. स्वर तेच. रंग वेगळा, रस वेगळा !

आता त्यानी ठुमरी सुरू केली. दर्दभरी ! ती सतार नव्हती. जणु कुणी गायक होता. सतारीला कंठ फुटला. आवाजातील खटक्या-मुरक्यांसह सतार गाऊ लागली,

"बाबूल मोरा नैहर छूटो जाय,
चार कहार मिल मोरी डोलिया सजाये
मोरा अपना बेगाना छूटो जाय ॥१॥
अंगना तो पर्वत भयो देहरी भई बिदेस
ले बाबुल घर आपेनो मैं चली पियाके देस"

सैगलच्या गळ्यातून ही ठुमरी ऐकताना जीव कासावीस होई ! तीच ठुमरी सही सही सतारीतून उमटत होती. सुरातून अंतर्वेदना ठिबकत होती. अंतर्व्यथेची कथा सुरात साकारत होती. जिव्हारी बोचत होती. ऐकणाऱ्याला पीळ पडत होता. मग त्या वादकाची काय अवस्था असेल. शोकाकुलतेचा तो आविष्कार विकल करणारा होता. अश्रुतपूर्व असा ! बऱ्याच वेळाने तो स्वरविलास थांबला. त्यांनी सावकाश सतार खोळीत दडवली अन् तिच्याबरोबर अंतर्वेदनाही ! त्यानी एक दीर्घ उसासा सोडला. व मी हळूच आत पाऊल टाकलं. काही वेळ आम्ही मौन होतो. पण ती शांतता स्मशानशांतता वाटू लागली. तिचा भंग करण्यासाठी काही तरी बोलायचं म्हणून मी म्हटलं,

"काका ! . . . . कसं ?"

"हे. . . . असं !" म्हणून ते हसले. ते हसणं रडण्यापेक्षाही जास्त करुण, जीव घेणारं होतं. मला रहावेना ! आसवांचा पूर लोटला. ते अगदी स्तब्ध ! चित्रासारखे . . . नंतर त्यांनी माझ्या खांद्यावर थोपटल्यासारखं केलं व म्हणाले, "अच्छा !"

बस् ! इतकंच !

गेल्या काही दिवसांपासून ते सतत भैरवीच वाजवत होते असं कळलं. काय वाजवलं असेल त्यांनी ? रोज, नित्य नवं ? ही भैरवी त्यांचा स्मृतिपट उलगडत असेल का ? त्या पटावरील सारं उलगडलं असेल का ? की अजून बरंचसं उरलं असेल. जे उरलं असेल ते कधी सरणार होतं का ?

अनपेक्षित ठिकाणी भेटण्याची या भैरवीला नित्याची संवय ! प्रत्येक क्षणी नवं रूप ! अन् त्या त्या ठिकाणचं ते दर्शन अंतरीचा ठाव घेतं.

आम्ही गेलो होतो मसूरीला ! प्रेक्षणीय स्थळी जायचं अन् अंथरुणात रामप्रहरी लोळायचं, त्यात काय राम ? म्हटलं रामप्रहर कसा असतो तो मसूरीला तरी बघावा ? हिमशिखरांचं विलोभनीय दृश्य पहावं ! परंतु ते दृश्य भाग्यात नव्हतं. सारीकडे हिमपटलाचं आच्छादन ! वर, खाली, सभोवार दशदिशात कुठेही नजर टाकली, तरी काही म्हणता काही दिसेना ! जड, चेतन एका रंगी रंगले ! विविध रंग एका श्वेत रंगात विलीन झाले. अभूतपूर्व असं ते दृश्य ! अज्ञाताची ओढ लावणारं ! सारंच गूढ ! निर्वाणाचा पथ असाच असेल का ? चराचर सृष्टीची कुठलीच खूण तेथे नसेल का ? सर्वस्वी अनोळखी, अनोखा असा तो मार्ग असेल का ? पण मध्येच हा काय चमत्कार











झाला ? हे सूर कुठले ! श्वेतनगरीतल्या स्वर्गांगनांचे ? पण 'स्वर्गांगना' तरी कसं म्हणू ? सूर वरून येत नव्हते, खालून येत होते. . . . रस्त्यावरील पुलावर मी बसले. खाली सर्वत्र पाहिलं. पण सर्वव्यापी दाट हिमपटलाखेरीज काही नाही. ही काय किमया झाली ? हिमपटलाला कंठ फुटला होता का ? हिमपटल निर्गुण निराकार ! सूरही निर्गुण निराकार ! शून्यात आपल्या वस्त्राचा विस्तार करणारं हिम व शून्यात आपलं साम्राज्य सजवणारे सूर दोन्ही समानशील ! मग त्यांचं सख्य कां नांदू नये ? आजपर्यंत हे सूर जडसृष्टीत ऐकले होते. पण याक्षणी जडसृष्टी विरली होती. यक्षिणीची कांडी फिरली होती व स्वप्नांचं साम्राज्य निर्माण झालं होतं. तरल, विरल स्वरांसारखं !

शेवटी पहाण्याचा अट्टाहास सोडून कान ते स्वर साठवू लागले. स्वरांना आकार येत होता. मूर्ति साकार होत होती. भैरवीच्या स्वररेखांनी . . .

"विद्यादानी, दयानी सरस्वती, माता महापाकबानी सुरसुंदरी..."

एकूण ही मसूरी नव्हती. तर सुरसुंदरीचं साम्राज्य होतं. या 'श्वेतवसनी'साठी ही श्वेतनगरी निर्माण झाली होती. रंगाचे भेद, आकाराचं द्वैत या नगरीत विरलं, ते उगाच नाही. "ही जगजननी, दुखहरनी" येणार तिच्या आगमनाची ही तयारी ! तिच्यासाठी हा हिमपथ तयार झाला होता. शुद्ध सात्विक असं हिचं रूप ! तिचं स्वरूप तसंच अबाधित रहावं म्हणून तिच्या अग्रदूतांनी ही दक्षता घेतली होती. एकनिष्ठेने घासून पुसून तो मार्ग पावन केला. तिच्या पावलांचं मार्दव जपण्यासाठी, मृदुतम अशा हिमकणांची पखरण केली. तिला सजविण्यासाठी तिची सखी 'भक्तीरस की खानी" भैरवी तिच्यासह आली होती. मोठ्या भक्तीनं ! अशा एकात्म भावानं मूर्ती घडवली तरच ती घडणार होती. श्वेतहंसाची स्थापना झाली. श्वेततर वसन व कमल आलं. श्वेततम अशी तिची रूपराशी, या हिमराशीसारखी ! त्या विश्वमोहिनीची प्राण-प्रतिष्ठा झाली. तिची मोहिनी सर्वत्र पसरली. स्थळकाळाची आठवण उरली नाही. पाय तेथेच खिळले . . . जगाचं भान उरलं नाही. स्वतःच्या अस्तित्वाची जाणीवही सरली. जाणीवेच्या पलीकडील नेणीव ! (विद्यादानीचं) हे दर्शन चिरकाल टिको, कधीही दृष्टिआड जाऊ नये हा विचार आला. . . अन् सारं बिघडलं ! क्षणात जाणीव होऊ लागली. अतिशय दुःखद जाणीव ! कारण श्वेतपदर हळू हळू विरत बाजूला सरला. अन् आत दडलेली, दऱ्या-खोऱ्यात वसलेली वस्ती दिसू लागली. देवदार वृक्ष, सुबक घरं ! ....

स्वरांची गंगोत्री गवसली. पण सरस्वती हरवली. दूर दूर निघून गेली. श्वेतपटल फडकावीत ! अन् तिच्याबरोबर तिची सखी भैरवीही गेली ! सूर गेले. शब्द उमटले,

"यह आकाशवाणी दिल्ली है !"

●●●














# मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध

–डॉ. भ. ग. कुंटे
सह-संपादक, महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका

**जिंजीचा पराभव**

अनेक ठिकाणी एका वेळी हल्ले करून आपला खरा उद्देश काय आहे याची शत्रूला यत्किंचितही जाणीव न देता त्याच्या मर्मस्थानावर हल्ला करावयाचा आणि त्याची त्रेधातिरपीट उडवून देण्याच्या तंत्राचा अवलंब करण्याचे आता रामचंद्रपंताने ठरविले. मराठे आता स्वराज्याबाहेर पडत नाहीत अशा भ्रमात बादशहा असताना मराठ्यांची १५००० पेक्षा अधिक असलेली सुसज्ज सेना जिंजीची वाट चालू लागली. त्यांनी जिंजीजवळ पहिला प्रहार इस्माईल खान मखा यावर करून त्याची वाताहत उडवून दिली. ह्या विभागाचे अधिपत्य धनाजीकडे होते. तामीळनाडमधे मराठे इतके पसरले की बादशहाची गलगली येथील छावणी आणि तामिळनाड यामधील सर्व संबंध तुटला. धनाजीच्या पाठोपाठ संताजी आला. त्याला तोंड देण्यासाठी कांचीचा फौजदार अलीमर्दानखान चालून गेला. त्याला संताजीने मारून काढले. त्याला स्वतःला कैद केले आणि त्याचे हत्ती, घोडे, उंट आणि इतर सर्व सरंजाम लुटला. आता मराठ्यानी जिंजीच्या किल्ल्यावरच धाड घातली. "मराठे दररोज मोंगल छावणीभोवती पसरून धामधूम करीत. अशा स्थितीत एक परमेश्वराशिवाय मोंगलाना कोणी त्राता राहिला नाही." अखेर मोंगलानी आम्ही जिंजीचा वेढा उठवितो आम्हाला वांदिवाशला जाऊ द्या अशी राजारामाची याचना केली. राजारामाने या गोष्टीला मान्यता दिली. भीमसेन म्हणतो "मोंगल सैन्य छावणीतून बाहेर पडले. सुमारे एक हजार मराठे स्वार सैन्याच्या मागेमागे येऊ लागले. त्यांनी मोंगल सैन्याचे बाजारबुणगे आणि सामानसुमान मनसोक्त लुटले. तीन दिवसांनंतर मोंगल सैन्य वांदिवाशला आले". ह्या घटना तामिळनाडमध्ये होत असताना जुलै १६९३ मधे नावजी नाईक बलकवडे या मराठा सरदाराने सिंहगडचा पाडाव केला[1]. रायगडाचा पाडाव झाल्यावर मोंगलानी सबंध कुलाबा जिल्हा व्यापला होता. मराठ्यानी कुलाबा जिल्ह्यात धामधूम उडवून दिली. वैकुंठगड, कर्नाळा आणि पट्टा हे किल्ले त्यांनी घेतले. शाहूच्या काळात प्रसिद्धीस आलेल्या आणि साऱ्या पश्चिम किनाऱ्यावर जरब बसविणाऱ्या कान्होजी आंग्रे याने याच सुमारास उचल खाल्ली आणि कुलाबा जिल्ह्यातील निम्म्या वसुली उत्पन्नाचे अधिकार मराठ्यांना मिळवून दिले "कान्होजी आंग्रे व सिद्दी याचा तह व राजकोट, सागरगड, उंदेरी व परहून येथे दुतर्फा अंमल सुरू" अथवा "कान्होजी व भिवजी गुजर यांचा मामतखान याशी तह होऊन प्रांतात निम्मी वाटणी झाली" ह्या नोंदी वरील विधानाची सत्यता दाखविण्यास पुरेशा आहेत[2] इतर ठिकाणीहि स्वराज्यात मोंगल आणि मराठे यांच्या चकमकी झडत होत्या. किल्ल्यांचीहि अदलाबदल होत होती. पण कोठेच मराठ्यांना आळा घालण्यात मोगलांना यश मिळाले नाही. इतकेच काय तर पन्हाळा किल्ल्याला मोंगलानी दोन वर्षे (१६९३–९४) वेढा घालूनहि किल्ला घेण्यात त्यांना अपयश आले आणि वेढा उठवून त्यांना परत फिरावे लागले. वेढा चालू असताना एकदा रामचंद्रपंत अमात्य आणि परशुराम

१ शिवचरित्र साहित्य खंड ५, पान १८८
२ कुलावकर आंग्रे, ढव्रू, आंग्रे शकावली पान चार








प्रतिनिधि ८०,००० घोडेस्वार आणि असंख्य पायदळ घेऊन किल्यावर चाल करून आले आणि मोंगल पहारा मारून त्यांनी किल्यावर रसद पोहोचविली. याच कालावधीत बहादुरखानाच्या सांगण्यावरून औरंगजेबाने मराठ्यांशी तह करण्याचा प्रयत्न केला. पण आता मराठे तहाची बोलणी करण्याच्या मनस्थितीत नव्हते. शत्रूची ताकत त्यांनी जोखली होती आणि स्वतःच्या सामर्थ्याबद्दल त्यांचा आत्मविश्वास वाढला होता. मोंगलांची युद्धाची खुमखुमी आपण जिरवू एवढेच नव्हे तर त्यांना नेस्तनाबूद करू याबद्दल त्यांना खात्री वाटत होती. मोंगलांचे लक्षावधि सैन्य आणि मारक तोफखाना याला आता ते भीक घालत नव्हते.

## इ. स. १६९५

इ. स. १६९५ हे वर्ष संताजीने आपल्या पराक्रमाने गाजविले ह्याच वर्षी म्हणजे मार्च १६९५ मधे औरंगजेबाने आपली छावणी गलगली येथून हलविली आणि तो ब्रह्मपुरी येथे येऊन दाखल झाला. स्वराज्यातून बाहेर पडून तामिळनाडकडे जाणाऱ्या मराठ्यांच्या फौजास सक्त प्रतिकार करून परतवून लावावे असा हुकूम त्याने सोडला. या वेळी सारा पश्चिम महाराष्ट्र आणि दक्षिण युद्धाच्या खाईत पेटले होते. हा स्वराज्याचा प्रदेश, हा शत्रूचा आणि हा तटस्थ असा विचार करण्याची सेनानींना फुरसत नव्हती आणि गरजही नव्हती. धनाजीची फौज वेलोर मुक्कामी होती आणि त्याच्या पाठोपाठ संताजी प्रचंड सैन्य घेऊन निघाला होता. दोड्डेरी इलाख्याचा अधिकारी कासिमखान याला औरंगजेबाने संताजीचा नाश करण्याची आज्ञा दिली आणि त्याच्या मदतीसाठी म्हणून आपल्या जवळील रुहुल्लाखान, सफशिकन खान, महमद मुरादखान, मिर्जा हसन आणि इतर नामवंत सरदार रवाना केले. संताजी घोरपडे कोणत्याही प्रसंगाला तोंड देण्याला तयार होता. त्याने गनिमी युद्धाचा डाव टाकून मोंगलावर उघडउघड हल्ला करण्याचे ठरविले. खाफीखान म्हणतो "त्या दिवशी सकाळपासून संध्याकाळपर्यंत मराठे आणि मोंगल यांच्या फौजा लढत होत्या. बादशाही सैन्यातील शिपायांनी शौर्याची शर्थ केली. पण सैन्याचे सगळे बुणगे व सामानसुमान पूर्णपणे नष्ट झाले... माणसाना आणि जनावराना खाण्यास काही राहिले नाही. . .युद्धात मिर्जा हसन आणि त्याच्याबरोबर असलेले लहानमोठे अनेक लोक प्राणास मुकले." अशा तऱ्हेने मोंगल सैन्यावर मोठा हलाखीचा प्रसंग ओढवला. तेव्हा कासीमखानाने दोड्डेरीच्या गढीचा आश्रय घेण्याचे ठरविले. गढीत माणसांची दाटी झाली. बाहेरून मराठ्यांनी गढीला पूर्णपणे वेढून टाकले. "शेवटी परिस्थिती अशी झाली की लष्करातील गुरेढोरे, घोडे यांचा जवळ जवळ निकाल लागला होता. उरली सुरली जनावरे त्या लोकांनी मारून खाल्ली" अशा परिस्थितीत कासिमखानाला मरण आले. रुहुल्लाखान आणि इतर सरदारांची पाचावर धारण बसली. त्यांनी संताजीकडे सुटकेची बोलणी लावली. संताजीने जबर खंडणी वसूल करून घेऊन नेसत्या वस्त्रानिशी वरील सरदार मंडळीना गढीतून काढून लावले. मराठ्यांच्या हातून फजित पावलेल्या या सरदार मंडळींना बादशहाकडे जाण्याची लाज वाटली.

**मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाची पद्धती गनिमी काव्याची होती आणि त्या जोरावरच त्यांनी मोंगलाना धूळ चारली. औरंगजेबाने संभाजीला ठार मारून येसूबाई व शाहू यांना कैद केले तरी न डगमगता राजारामाने शत्रूला हुलकावण्या देत सतावण्याचे कार्य सुरू ठेवले आणि मराठ्यांचे रणझुंझार सेनापती संताजी व धनाजी या जोडीने या कामी बहुमोलाची साथ केली. १६९२ मध्ये मराठ्यांनी पन्हाळगड पुन्हा शत्रूकडून जिंकून घेतला या घटनेपर्यंतची माहिती 'दीपावली'च्या मे १९६८ च्या 'भारतीय सेना विशेषांका' मध्ये प्रसिद्ध झाली आहे. त्यानंतर १७०७ च्या फेब्रुवारीत औरंगजेबाचा मृत्यू होईपर्यंतच्या पंधरा वर्षांच्या काळात मराठ्यांनी गाजविलेल्या मर्दुमकीची माहिती या उत्तरार्धात वाचा——**

अर्थात जिथे औरंगजेबाची युद्धनितीच चुकली होती आणि जिथे त्याचे युद्धकौशल्यच दुबळे पडले होते तिथे हे सरदार तरी काय करणार? बादशाहाने फजित पावलेल्या या सरदारमंडळींची युद्धक्षेत्रातून उचलबांगडी करून त्यांच्या दूरवर नेमणुका केल्या. कासिमखानाच्या पाठोपाठच संताजीने बहादुरखानाचा मुलगा हिंमतखान याच्यावर बसवापट्टण येथे हल्ला करून त्याला ठार मारले. मराठ्यांच्या या प्रचंड यशात संताजीइतकाच धनाजीचाही वाटा होता.

## मोहरा हरपला

मराठेशाहीच्या यशाची ही वाढती कमान होत असतानाच या दोघा रणझुंझारात वैमनस्य आले. संताजी रांगडा शिपाईगडी होता. मुत्सद्याचा कावेबाजपणा त्याच्यात नव्हता. प्रसंगी राजारामाचीही त्याने मुर्वत ठेवली नाही. त्याच्या या वागण्यावरून रामचन्द्रपंतानी त्याला एकदा लिहिले "राजश्री स्वामीजवळ मुद्दे घालू नयेत, मर्यादेने रहावे" अर्थात् या उपदेशाचा उपयोग झाला नाही. राजारामाने संताजीकडून सेनापतिपद काढून ते धनाजीला दिले. लाखांचा पोशिंदा रानोमाळ, वणवण भटकून दिवस काढू लागला. शत्रू तर त्याच्या जीवावर टपला होताच पण जीवाला जीव देणाऱ्या घरच्या माणसानीहि त्याच्यावर सूडाची तलवार उचलली. या दुहीत संताजीचा नागोजी मान्याकडून वध झाला. संभाजीराजांच्या मृत्यूनंतर मराठेशाहीवर गुजरलेला हा दुसरा भयानक प्रसंग. मराठ्यांचे दैव बलवत्तर आणि मोंगलांचे नशीब फुटके म्हणून या दुहीतून मराठे निभावून गेले. संताजीबद्दल खाफीखान याने काढलेले पुढील उद्गार संताजीच्या मोठेपणाची ग्वाही देतात—"ज्याला ज्याला म्हणून संताजीशी मुकाबला करण्याचा प्रसंग आला त्याच्या त्याच्या नशिबी खालील तीनपैकी एक परिणाम ठेवलेला: एक तर तो मारला जाई किंवा जखमी होऊन कैदेत सापडे किंवा त्याचा पराजय होई आणि त्याचे सैन्य आणि बाजारबुणगे गारद होत. आपण जीवानीशी निसटलो हाच आपला पुनर्जन्म झाला असे त्याला वाटे."

संताजीच्या मृत्यूमुळे जरी धनाजीच्या कर्तबगारीला वाव मिळाला आणि संताजीएवढीच किंबहुना काकणभर जास्तच सेवा धनाजीने








केली तरी वरील घटनेमुळे मराठ्यांच्या युद्ध प्रयत्नात तात्पुरती का होईना पोकळी निर्माण झाली. जिंजीला पुन्हा मोंगलांचा वेढा पडला. औरंगजेब आता थोडाफार हताश झाला होता. त्याच्या अधिकाऱ्यांच्या प्रामाणिकपणाविषयी त्याच्या मनात शंका निर्माण झाली. त्याच्या खाजगीतील अधिकारी इरादतखान याजजवळ तर तो एकदा हताशपणे म्हणाला "ही मोहीम आटपून लवकरच उत्तरेत परत जावे असा मी विचार केला होता. पण माझ्या सेनापतींनी मला आपले खेळणे बनविले आहे." वेढा चालू असतानाच राजाराम जुल्फिकारखानाच्या संगतमतानेच किल्ला सोडून स्वराज्यात परत आला. राजारामाने जिंजी सोडली आणि किल्ला मोंगलांच्या हाती पडला. राजारामाने जिंजी सोडली आणि युद्धक्षेत्र तामिळनाडमधून परत स्वराज्याच्या दिशेने हलले. संताजीच्या मृत्युमुळे मराठ्याना तामिळनाड गमवावा लागला तो कायमचाच. मराठ्यांच्या युद्ध प्रयत्नांची सारी मदार आता नवीन सेनापति धनाजी जाधव याजवर होती.

रामचंद्रपंत आणि धनाजी यांनी आता युद्धाची वेगळ्या पद्धतीने आखणी करण्याचे ठरविले. तामिळनाड हातचे गेले ही घटना त्यावेळी तरी इतकी महत्वाची नव्हती. तामिळनाडमधील मोंगल सेना तामिळनाडचा बंदोवस्त करण्यासाठी अडकून राहिल्या तर तेथील मराठा सेनाविभाग मोकळे झाले. या सेनाविभागांचा उत्तम प्रकारे उपयोग करून घेण्याचे मराठा मंडळाने ठरविले. स्वराज्यामधे स्थित असलेल्या मोंगल सैन्याला तोंड देण्यास मराठी सेना सज्ज होत्या. तामिळनाडमधील या फौजांचा उपयोग स्वराज्याच्या आवतीभोवती पसरलेल्या मोंगली मुलुखावर धाडी घालून मोंगलांच्या रसदीचे मार्ग तोडण्याचे कामी करण्याचा मराठा मंडळाने बेत केला. युद्ध जिंकण्यासाठी अतिशय महत्वाची कारवाई म्हणजे शत्रूचा रसदमार्ग तोडून त्याची युद्धयंत्रणा खिळखिळी करणे हा होय आणि हेच नेमके मराठ्यांनी केले. त्यांच्या फौजा नाशिक, बागलाण, खानदेश, मराठवाडा, वऱ्हाड, कर्नाटक या भागात पसरल्या. समोरासमोर युद्ध तर करावयाचे नाही पण आम्ही ताकदीने हजर आहोत ही जाणीव मात्र शत्रूच्या मनात कायम जागती ठेवावयाची ह्या धोरणाचा मराठ्यानी अवलंब केला. मराठ्यांची वेगवेगळी पथके येसाजी आणि खंडोजी दाभाडे, नेमाजी शिंदे, विश्वासराव पवार, परसोजी भोसले, धनाजी जाधव, हणमंतराव निंबाळकर, बहिर्जी घोरपडे आणि राणोजी घोरपडे या सेनानींच्या हाताखाली धुमाकूळ घालू लागली. इ. स. १६९८ मधे बुऱ्हाणपूर आणि नंदुरबारवर मराठ्यांच्या धाडी पडल्या. इ. स. १६९९ मधे मराठे औरंगाबाद, वऱ्हाड आणि खानदेशमधे घुसले तर धनाजीने खुद्द हैद्राबादेपर्यंत धडक मारली. याचवर्षी मराठे प्रथमच नर्मदापार झाले. भविष्यकालीन घटनांची ही सूचक निशाणी होती. भीमसेन म्हणतो "या सुमारास कृष्णा सावंत हा मराठा सरदार १५००० स्वारांनिशी नर्मदापार झाला. त्याने धामुनी या गावाजवळच्या प्रदेशात धामधुम उडविली. यानंतर तो तेथून परतला. मुसलमान सुलतानांच्या काळापासून आजपर्यंत मराठे कधीच नर्मदापार झाले नव्हते."



## मराठ्यांचे चढाऊ धोरण

मराठ्यांच्या या चढाईने औरंगजेब हताश झाला. सतत १८ वर्षे युद्ध खेळल्याने मोंगलांची दमछाक झाली होती आणि त्याच्यामधील पहिला जोश ओसरला होता. बादशाहा स्वतः आता ८० च्या घरात आला होता. अशावेळी Tactical Warfare असे म्हणता येईल त्या दृष्टीने त्याने अतिशय चुकीचा असा निर्णय घेतला आणि तो म्हणजे "या दुष्ट जमातीचे निवासस्थान म्हणजे किल्ले. ते जिंकून घ्यावे आणि या कुटिल जमातीची पाळेमुळे खणून काढावी या कामाच्या मागे लागण्याचे त्याने ठरविले. बादशहाने या मोहीमेचा पक्का निर्धार केला." कदाचित यावेळी त्याने शाहूला सोडून देऊन उत्तरेत जाण्याचे ठरविले असते तर त्याची अखेरची वर्षे सुखात गेली असती. पण बादशहाला आता तेवढा विवेक राहिला नव्हता. त्याचा मृत्यु इथेच व्हावा आणि मोंगली सत्ता नाहीशी व्हावी असे विधात्याने ठरविले होते म्हणूनच की काय बादशहाला अशी दुर्बुद्धी झाली. किल्ले म्हणजे मराठ्यांचे सारसर्वस्व हे जरी खरे होते तरी दुर्गम आणि अभेद्य पहाडावर बांधलेले हे दुर्ग सहजासहजी हाती पडतील अशी बादशहाची भावना जी होती ती चुकीची होती. पण होणार ते चुकत नाही या उक्तीप्रमाणे १६ आक्टोबर १६९९ रोजी बादशहाने आपली ब्रह्मपुरी येथील छावणी मराठ्यांचे किल्ले घेण्याचे उद्देशाने सोडली. याचवेळी राजारामाने वऱ्हाड खानदेशात स्वारी करण्याचा आणि नंतर शाहू आणि येसूबाई यांची सुटका करण्याचा अशयस्वी प्रयत्न केला. औरंगजेबाचा पहिला वेढा वसंतगडला पडला. किल्ला जमेल तितका काळ लढवावयाचा, शत्रूची

अनुक्रमणिका

रब्बी पिके निघाली...

खरीप पिकांची उसाभर
आता सुरू होणार

संकरित बियाणे वापरून
अन्नधान्य स्वयंपूर्णतेचे
ध्येय गाठू !



आठव्या महाराष्ट्र दिनाची हीच प्रतिज्ञा

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई.

अतोनात हानी करावयाची आणि मग किल्ला शत्रूच्या स्वाधीन करावयाचा हे मराठ्यांचे धोरण होते. कारण मोंगलांची पाठ फिरताच आपण किल्ला परत जिंकून घेऊ याविषयी त्यांची खात्री होती. कारण जिंकलेल्या किल्ल्यावर बचावाइतकी शिबंदी ठेवणे मोंगलांना शक्य नव्हते. महिन्याभराच्या वेढ्यानंतर २५ नोव्हेंबर १६९९ रोजी मराठ्यानी किल्ला सोडून दिला. किल्ल्याचे नांव औरंगजेबाने 'किलीदे फतह्' असे ठेविले. यानंतर औरंगजेबाने साताऱ्याच्या किल्ल्याकडे कूच केले. ८ डिसेंबर १६९९ रोजी साताऱ्याच्या किल्लाला मोंगलांचा वेढा पडला. "प्रचंड आणि अक्राळविक्राळ तोफा त्यानी मोर्च्यावर चढविल्या. किल्यावर तोफांचा प्रचंड मारा सुरू झाला. पण किल्ला काय, तेथे तीस गज उंच असा सरळ डोंगरच उभा होता. त्याच्यावर सहा गज उंचीचे दगडांचे तट बांधले होते. सारांश किल्ल्याचा तट म्हणजे भिंत नाहीच. तो डोंगरच होता. त्यामुळे तोफांच्या माऱ्याने त्याच्यावर परिणाम होईना."[1] किल्ल्याचे अधिकारी सुभानजी आणि प्रागजी प्रभू हे होते. त्यांनी मोठ्या नेटाने किल्ला लढविला तर बाहेरून मोंगलांच्या छावणीवर मराठ्यांनी हल्ले सुरू केले. धनाजीने तर ब्रह्मपुरी येथील बादशहाच्या उर्वरीत छावणीवरच धाड घातली. १७०० साल उजाडले. एकदा बादशहा अतिशय निराश होऊन आपल्या काजीजवळ म्हणाला "रमजानचा महिना सोलापूर येथे प्रार्थना करण्यात घालवावा असे मला वाटत होते. पण काय करू? माझे अधिकारी मनःपूर्वक काम करीत नाहीत. मी त्याना पुन्हा पुन्हा सांगतो पण त्याचा काहीच परिणाम होत नाही."

## राजारामाचा मृत्यु

साताऱ्याचा वेढा चालू असताना मराठ्यांवर आणखी एक आपत्ती कोसळली. ती म्हणजे छत्रपति राजारामाचा २ मार्च १७०० रोजी सिंहगड येथे झालेला आकस्मिक मृत्यु. राजारामाची गणना रणझुंजार पुरुषात जरी करता येण्याजोगी नसली तरी काळाची पावले ओळखून योग्य मुत्सद्यांच्या सल्लामसलतीने चालून ११ वर्षे राज्याचा शकट निस्वार्थीपणे चालविण्यात त्याने जे कौशल्य दाखविले त्यामुळे त्याची गणना थोर व्यक्तीत निश्चितच करावी लागेल. राजारामाचा मृत्यु हा जरी मराठ्यांना बसलेला जबरदस्त धक्का होता तरी एक व्यक्ती गेल्यामुळे युद्ध थांबवून पराभव पत्करणे शक्य नव्हते. राजारामाच्या मृत्युमुळे बादशहाला दिलासा वाटून त्याच्या छावणीत जरी शहादणे वाजली तरी क्षणभर सुन्न झालेले मराठ्यांचे मन शत्रूच्याबद्दल वाटणाऱ्या त्वेषाने प्रज्वलित झाले. राजारामाची जागा त्याची पत्नी ताराबाई हिने घेतली. तिच्याबद्दल खाफीखानाने जे उद्गार काढले ते किती यथार्थ होते हे तिने यापुढील सात वर्षे आपल्या कर्तृत्वाने गाजविली त्यावरून सहज कळून येते. राजारामाच्या मृत्युनंतर "ते (मोंगल) एकमताने म्हणू लागले, 'या दुष्ट मराठ्यांची पाळेमुळे नाहीशी झाली. त्याच्या मागे त्याची लहान मुले आणि बायका राहिल्या आहेत. त्यांचा निकाल लावणे हे अगदी सोपे काम आहे' पण कवीने म्हटले आहे 'शत्रूला कधीच क्षुद्र आणि दुर्बल लेखू नका.'. . . . ताराबाई ही राजारामाची थोरली बायको होय. ती बुद्धिमान आणि शहाणी होती. . . तिने विलक्षण धामधुम उडविली. या बाबतीत तिचे सैन्याच्या नेतृत्वाचे आणि मोहिमांच्या व्यवस्थेचे गुण प्रकर्षाने प्रकट झाले".

1 Sir J. N. Sarkar in I.H.R.C, Vol, IX, Jan. 1922

## बादशहावरील प्रसंग

साताऱ्याचा वेढा रेंगाळतच चालला. किल्ल्यावर हल्ला करून किल्ला जिंकता येत नाही हे पाहून औरंगजेबाने कपटनितीचा अवलंब केला. रामचंद्रपंत अमात्य यांच्या नावे पत्र लिहून ते परशुरामपंत प्रतिनिधी यांच्या हाती पडेल अशी त्याने व्यवस्था केली. काही काळ गैरसमज झाले परंतु मराठ्यांचे भाग्य थोर म्हणून ते फार काळ टिकले नाहीत. रामचंद्रपंत, प्रल्हाद निराजी, शंकराजी नारायण, परशुरापंत, धनाजी, खंडोबल्लाळ हाच मुत्सद्दी सेनानींचा वर्ग स्वराज्याच्या रक्षणासाठी ताराबाईच्या नेतृत्वाखाली पुन्हा हिरीरीने सज्ज झाला. साताऱ्याच्या वेढ्यात मोंगलांचे अतोनात नुकसान झाले. १३ एप्रिल १७०० रोजी मोंगलांनी किल्ल्याचा तट उडविण्यासाठी लावलेला सुरुंग उडविला. "किल्याची भिंत आत न कोसळता बाहेर उभ्या असलेल्या मोंगल सैनिकावर पडली. ते सगळे त्याखाली दबले गेले. या दुर्घटनेमुळे भयंकर हाहाःकार झाला. अनेक लोक उंच फेकले गेले. त्यांची शरीरे छिन्नविच्छिन्न झाली. एकंदरीत २००० शूर वीर मृत्युमुखी पडले" किल्ला झुंजवून मोंगलांचे अधिकात अधिक नुकसान करण्याचा मराठ्यांचा उद्देश आता साध्य झाला होता. त्यांनी २१ एप्रिल १७०० रोजी किल्ला मोंगलांच्या स्वाधीन केला. किल्ल्याचे नाव बादशाहाने बदलून 'आजमतारा' असे ठेवले. साताऱ्याहून मोंगलांची सेना सज्जनगड उर्फ परळीकडे वाट चालू लागली. वेढ्याचे मोर्चे ३० एप्रिलला लागले. एक महिन्याच्या निकराच्या वेढ्यानंतर देखिलही मोंगलांची प्रगति होईना. आता पावसाळ्यास सुरवात झाली होती. साकी मुस्तैदखान या प्रसंगाचे वर्णन करताना म्हणतो, "पाऊस धो धो पडत होता आणि लष्करात धान्याची व चाऱ्याची कमालीची टंचाई होती. . . परिस्थितीच्या चित्रणाची नुस्ती कल्पना केली तरी माझ्या प्रतिभेचा झरा एकदम आटून जातो. काळे मेघ रात्रंदिवस वर्षत होते. अनाथांच्या नेत्रांतून अश्रूंची अखंड धार लागावी तसा रात्रंदिवस पाऊस पडत होता." सरतेशेवटी आज्जमने मध्यस्थी केली आणि मराठ्यानी परळीचा किल्ला नऊ जून १७०० रोजी सोडला. बादशहाने किल्ल्याचे नांव "नौरसतारा" ठेवले. बादशाही फौज आता भूषणगडची वाट चालू लागली. २५ जुलैला बादशहा भूषणगडावर पोहोचला. भूषणगड सहजगत्या मोंगलांच्या हाती पडला. तेथून बादशहाने आपला मुक्काम ३० आगस्ट रोजी हलविला आणि ३० ऑगस्टला त्याने खवासपूरला छावणी दिली. किल्ले घेण्यात बादशहा गुंतला असताना मराठ्यांचे सेनाविभाग मोंगली मुलुखात धुमाकुळ घालीत असल्याच्या बातम्या बादशहाला संत्रस्त करीत होत्या. मराठ्यांच्या दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या जोराला आवर कसा घालावा याची त्याला काळजी पडली होती.

मोंगलमराठा संघर्षात मोंगलांच्या दोन पिढ्या खर्ची पडल्या होत्या. जुने नाणावलेले सेनानी मारले गेले होते अगर काळाच्या ओघात गडप झाले होते. एकटा जुल्फिकारखान हाच सेनानी असा होता की जो मराठ्यांना पायबंद घालू शकला असता. त्याची नियुक्ति बादशहाने धनाजी जाधवावर केली. या दोघामधील धावता पळता संघर्ष म्हणजे इतिहासातील एक आश्चर्यच आहे असे म्हणावे लागले. जुल्फिकारखानाला अंगावर घेत पण समोरासमोर लढाईचा प्रसंग आणू न देता धनाजीने हजारो मैलांची घोडदौड केली. मोंगल सैन्याच्या हलाखीचे वर्णन करताना भीमसेन सक्सेना म्हणतो "मोंगल सैन्यातील घोडी अगदी गळून गेली होती. त्यांच्या अंगात चालण्याचे सामर्थ्यच नव्हते. पुष्कळ स्वार पायउतारा होऊन चालू लागले. . . इतक्यात पावसाळ्याला सुरवात झाली. भयंकर पावसामुळे घोडी, जनावरे नष्ट झाली. . . . सततच्या चालण्यामुळे लष्करातील हत्ती लंगडू लागले. या मोहिमेत जुल्फिकारखानाच्या सैन्याला दोन हजार कोस फिरावे लागले" याच पावसाच्या थैमानाने बादशहाच्या खवासपूर येथील छावणीत हाहा:कार उडवून दिला. सगळीकडे पाणीच पाणी झाले. खाफीखान म्हणतो "पाण्याचा पूर येताच छावणीतून विलक्षण आक्रोश उठला. रात्रीच्या भयंकर अंधारात जो आरडा ओरडा झाला त्यामुळे वातावरण कंपायमान झाले" खुद्द बादशहा अंधारात पाय घसरून पडला आणि त्याला दुखापत झाली. पावसाळा संपल्यावर, मोंगल फौजा पन्हाळा किल्ल्याकडे निघाल्या. औरंगजेब ९ मार्च १७०१ रोजी पन्हाळगडाजवळ पोहोचला. किल्ला सुखासुखी हातचा जाऊ देण्याची मराठ्यांची तयारी नव्हती. मराठ्यांची जिद्द केवढी होती याविषयीची कल्पना तत्कालीन दोन पत्रातील काही मजकुरावरून दिसून येते. विठोजी केसरकर याला राजा श्री शिवछत्रपति याजकडून गेलेल्या पत्रात अशी आज्ञा होती "मोर्चा मारावयाची तजवीज राजश्री त्र्यंबक इंगळे व राजश्री कान्होजी इंगळे यास लिहिले आहे. ते तुम्हास सांगतील त्याप्रमाणे तुम्ही अंगेजणी करुन मोर्चियावरी जाऊन मोर्चा शर्तीनिशी मारून काढणे आणि आपला नामोश करून घेणे. स्वामी तुमचे ऊर्जित करतील जाणिजे" विठोजी केसरकर हा पावनगडचा किल्लेदार होता. दुसऱ्या एका पत्रात त्याला आज्ञा मिळाली की "तुम्ही एकनिष्ठ सेवक तैसेच अहा. या उपरी औरंगजेब आला आहे तरी त्याचा हिसाब न धरता स्वामीची जागा जतन करणे"[1] पन्हाळगडावर चढाई करून तो जिंकून घेण्याचे मोंगलांचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. अखेर ५५००० रुपये किल्लेदारास देऊन २८ मे, १७०१ रोजी किल्ला मोगलांनी ताब्यात घेतला. त्यानंतर चंदनवंदन, वर्धनगड आणि नंदगिरी हे किल्ले मोंगलांनी जिंकले आणि मोंगली फौजा विशाळगडाकडे ७ नोव्हेंबर १७०१ रोजी रवाना झाल्या. १६ जानेवारी १७०२ रोजी विशाळगडच्या वेढ्याला सुरवात झाली. ४ महिने वेढा चालला आणि पाऊस धो धो कोसळू लागला. पैसे चारून किल्ला ताब्यात घेण्याची चटक आता मोंगलांना लागली होती. खुद्द बादशहा देखील लाचार झाला होता. गेलेले किल्ले परत मिळविणे हा मराठ्यांच्या हातचा मळ होता. त्याने विशाळगडचा किल्लेदार परशुराम त्रिंबक याला जे पत्र लिहिले त्यात त्याची मनस्थिती दिसून येते. इतक्या तोलामोलाचा बादशहा आणि हिंदुस्थानभर पसरलेल्या मोंगली साम्राज्याचा सम्राट लिहितो "तुम्ही शहाजाद्याना भेटावे आणि खेळण्याचा किल्ला ताब्यात द्यावा. नंतर तुमचे अपराध माफ करण्यात येऊन तुम्हाला आणि तुमच्या सहकाऱ्याना जीवदान देण्यात येईल. आमची सैन्ये तुमचा मुलुख आणि किल्ले जिंकून घेण्यासाठी पुढे चाल करून जाणार नाहीत. उलट ती आपल्या मुलुखाकडे परत फिरतील" बादशहाने मराठ्यांच्या वर्चस्वाला दिलेली ही उघड उघड शरणागतीच होती. मराठे आता बादशहाला आपल्या मताप्रमाणे वागण्यास भाग पाडत होते. ज्याला Initiative म्हणतात ते मोंगलांकडून मराठ्यांकडे आले होते. बादशहाने आपला मुक्काम विशाळगडाहून हलविला आणि तो बहादूरगडाकडे निघून गेला. तेथून त्याने सिंहगड जिंकून घेण्यासाठी २ डिसेंबर १७०२ रोजी कूच केले आणि २७ डिसेंबरला तो सिंहगडापाशी पोहोचला. नेहमीप्रमाणे वेढा रेंगाळला. पाऊस डोक्यावर आला. तदबीयत खानाच्या तोफा किल्ल्याचा पाडाव करण्यात निकामी ठरल्या. अखेर किल्लेदाराला भक्कम रक्कम देण्यात येऊन किल्ला मोंगलांनी ताब्यात घेतला. बाद-

१ साताऱ्च्या प्रतिनिधी घराण्याचा इतिहास, १ पाने १७२, १७३



## अद्भूत रस–

**बंदे सेवक चित्रकार हे, जरी उपासक सौंदर्याचे**
**हिडीस करि परि रूप तयाचे, का नच अद्भूत हे ?—**
**पुराण वस्तू संग्रहगृही, अती पुराणी वस्तू पाहुनी**
**अडगळ म्हणुनी देत फेकुनी, का नच अद्भूत हे ? —**
**सांगोवांगी ऐकुनि काही, नाक खुपसतो नको तियेही**
**आणिक बोले 'तज्ञा'समही, का नच अद्भूत हे ?——**
**दिसे हाडाचा सांगाडा हा, हाड हाड ते घ्या मोजुनिही**
**परी जिथेला हाड नसेही, का नच अद्भूत हे ? —**
**बॉटम आणिक टॉपलेसही, ब्लाउज बटणें पाठीवरही**
**लावुनि देता लाजत पतिही, का नच अद्भूत हे ? —**
**अय्या! आणिक इश्य ! ! लोपले, नसे स्त्रैण्यही वा शब्दला**
**मुलीहि म्हणती बघा 'च्यायला' का नच अद्भूत हे ? —**

**–पंडित महाजन**

शहाने त्याचे नाव बक्षिदावक्ष असे ठेवले. किल्ले घेण्याच्या औरंगजेबाच्या या हव्यासामुळे मोंगल सैन्याला पूर्वीची हालचालीची सुकरता राहिली (Mobility) नाही. औरंगजेबाच्या वेढ्याच्या छावणीला एकाद्या शहराचे स्वरुप येई. मराठे खुशाल औरंगजेबाच्या छावणीवर तुटून पडून लुटालूट करीत. मोंगलाची प्रतिकारशक्तीच नाहीशी झाली. अशा स्थितीत बादशहा पुण्यास मुक्कामाला आला. त्याची स्थिती अगतिक झाली होती. युद्ध की तह हे प्रमेय त्याच्या डोळ्यासमोर होते. युद्धाला मराठ्यांची तयारी होती. आणि आपल्याला सोयिस्कर अशा अटीवर तह झाला तर तोही त्यांना पाहिजे होता. तहाची बोलणी तर सुरू झाली. प्रमुख मराठा सरदाराना बादशहाने बोलावणे पाठविले. बादशाही छावणीपासून काही अंतरावर या सरदारांची भेट शाहूने घ्यावी असे ठरले. त्याप्रमाणे मराठा सरदाराना पत्रे गेली. त्याप्रमाणे एकेक मराठा सरदार आपापल्या फौजेनिशी बादशाही छावणीजवळ जमू लागला. इतक्या मोठ्या संख्येने मराठा सरदार उपस्थित झालेले पाहून औरंगजेबाचे मन शंकेने ग्रस्त झाले. आपल्याला दगा-फटका होणार या भितीने त्याने बोलणी मोडून टाकली. बादशाही छावणीची लुटालूट करून मराठे पुन्हा इतस्ततः पसरले. इ. स. १७०३ मधे मराठा सरदार नेमाजी शिंदे माळव्यावर चालून गेला. वाटेत. वऱ्हाडात त्याची रुस्तमखानाबरोबर गाठ पडली. नेमाजीने त्याचा धुव्वा उडविला आणि त्याला ठार मारले. मोंगलांचे २००० सैनिक कामास आले. नोव्हेंबरमध्ये बादशहाने आपला मुक्काम पुण्याहून हलविला आणि राजगडाला वेढा देण्यासाठी कूच केले. ४ महिने मराठ्यानी किल्ला लढविला आणि १६ फेब्रुवारीला (१७०४) मोंगलांच्या ताब्यात दिला. मोगलांच्या फौजा यानंतर जवळच असलेल्या तोरणा किल्ल्याची वाट चालू लागल्या. फेब्रुवारीत किल्ल्याला वेढा पडला. काही दिवसांच्या चकमकीनंतर १० मार्च १७०४ रोजी किल्ला मोंगलांच्या हवाली झाला. औरंगजेबाने आता आपला मुक्काम खेड येथे नेला. या मुक्कामात राजमाची आणि लोहगड हे किल्ले मोंगलांनी घेतले. त्यावेळच्या परिस्थितीबद्दल भीमसेन सक्सेना लिहितो "औरंगजेब हा दक्षिणेची मोहीम जातीने चालवीत होता. सरकारी कागदपत्राप्रमाणे आणि त्याच्याजवळ असलेले आणि दख्खनच्या सुभ्यात ठिकठिकाणी तैनात केलेले सैन्य सर्व मिळून १७०००० होते. ते प्रत्यक्षात् किती होते हे सर्वांना माहीत आहे. समुद्र काठापर्यंत पसरलेल्या दख्खनच्या सुभ्याचे रक्षण इतक्याशा सैन्याने होणे कसे शक्य आहे?" आता औरंगजेबाची सत्ता केवळ नाममात्र उरली होती. त्याचे अमीर उमराव त्याचे आज्ञापालन करण्याच्या मनस्थितीत नव्हते. औरंगजेबालाही त्याची जाणीव होती. आपला शेवट जवळ आला आहे हे तो समजून चुकला होता. औरंगजेबाशी कमालीची निष्ठा बाळगून असलेला त्याचा सेवक इरादतखान याची त्याने मांडू प्रांतावर नेमणूक केली. त्याची आपली पुन्हा भेट होणे अशक्य आहे ते जाणून औरंगजेबाने त्याला म्हटले "आता माझी आणि तुझी ताटातुट होणार आहे. आपली भेट पुन्हा केव्हा होईल हे सांगता येत नाही. कळत नकळत मी तुझ्या विरुद्ध काही केले असल्यास मला क्षमा कर. 'मी क्षमा केली' हे वाक्य तीनदा म्हण. तू गेली कित्येक वर्षे माझी सेवा केली आहेस. तू माझ्याविरुद्ध कळत नकळत काही केले असल्यास मी पण तुला क्षमा करतो." अरेरे, वैभवाच्या अत्युच्च शिखरावर आपल्या तेजाने तळपत प्रतिस्पर्ध्यांच्या मनात आपल्या सामर्थ्याने थरकाप उडविणाऱ्या बादशहाची काय ही केविलवाणी अवस्था! १७०५ मध्ये औरंगजेबाने खेडहून वाकिण खेड्याकडे कूच केले. औरंगजेबाच्या छावणीवर ते बेघडक हल्ले करीत. त्यांनी मनात आणले असते तर बादशहाचा निकाल केव्हाच लावला असता. पण नियतीने वेगळे ठरविले होते. आपल्या स्वप्नांचा चक्काचूर झालेला पाहाण्याचे बादशहाच्या नशिबी होते. नाही तरी साऱ्या हुकूमशहांची गत तीच होते. आपल्या भावांचा निर्घृणपणे वध करून आणि बापाला हालहाल करून ठार मारून गादीवर आलेल्या औरंगजेबाचा शेवट आणखी कसा होणार होता? मराठ्यांच्या स्वराज्याच्या उमलत्या कळीला उखडून टाकून आपली साम्राज्यतृष्णा शमविण्यासाठी दक्षिणेत उतरलेल्या औरंगजेबावर आता आलेला प्रसंग म्हणजे काळाने घेतलेला निर्घृण सूडच नाही का? स्वराज्यातून बादशहाची पाठ वळली आणि जानेवारी १७०५ मधे मराठ्यानी लोहगड घेतला. एप्रिल १७०५ मधे मराठ्यांनी सिंहगड हस्तगत केला. जूनमध्ये राजमाचीचा पाडाव झाला. दरम्यान औरंगजेब वाकिण खेड्याची मोहीम आटोपून आपल्या शेवटच्या प्रस्थानासाठी अहमदनगरकडे रवाना झाला. तेथे तो २६ जानेवारी १७०६ रोजी पोहोचला. अहमदनगरला जात असताना मराठ्यानी बादशहावर एवढा मोठा कठिण प्रसंग आणला. भीमसेन लिहितो "या सहा दिवसांच्या प्रवासात मराठ्यानी बादशाही सैन्यावर घाडसी आक्रमणे केली.......ते मोंगलावर तुटून पडले......त्याच वेळी बादशहा आपल्या सिंहासनवजा उघड्या पालखीतून जात असताना त्यांना दिसले. बादशहाबद्दल आदराची भावना म्हणून मराठे लांबून त्याला पहात राहिले. मराठे असे वागले हे बादशहाचे भाग्यच म्हटले पाहिजे." या सुमारास बादशहाने जुल्फिकारखानास शाहूला बरोबर देऊन सिंहगड घेण्यास पाठविले. शाहूच्या उपस्थितीमुळे किल्लेदाराने किल्ला मोंगलांच्या स्वाधीन केला. परंतु मराठ्यांच्या चढाया चालूच होत्या. राजगड आणि वसंतगडवर हल्ला करून मराठ्यांनी ते घेतले. स्वराज्यामधील या चढाई बरोबरच धनाजी १५००० फौजेनिशी गुजरातेवर चालून गेला. रतनपूर येथे मोंगल मराठ्यात उघड उघड सामना होऊन मोंगलांची दाणादाण उडाली. धनाजीच्या हाती अब्दुलहमीदखान आणि नजरअल्लीखान हे दोघे अधिकारी लागले. मोंगलांचा सारा गोट मराठ्यांनी साफ लुटला. मोंगलांच्या नाड्या आता मराठ्यानी आवळत आणल्या होत्या. लढणे हे त्यांच्या आवाक्याबाहेरचे होते. यातून सुटका म्हणजे मृत्यु. बादशहाला आता ८८ वर्षे पूर्ण झाली होती. २५ वर्षांचा युद्धाचा ताण त्याच्या मनस्थितीवर पडला होता. वर्षा दोन वर्षांत आटोपणारे युद्ध पावशतकापर्यंत लांबले होते. राष्ट्रप्रेमाचे मोहोळ औरंगजेबाने डिवचले होते आणि महाराष्ट्राची सारी जनता औरंगजेबाच्या साम्राज्यवादाला गाडून टाकण्यासाठी आपल्या नेत्यांच्या हाकेला ओ देऊन सज्ज झाली होती. स्वातंत्र्ययुद्ध आता संपले होते. २० फेब्रुवारी १७०७ रोजी बादशहा मरण पावला. युद्धाला विराम मिळाला. इतक्या कणखरपणे आणि इतका काळ लढले गेलेले असे हे स्वातंत्र्ययुद्ध हिंदुस्थानच्याच काय पण जगाच्या इतिहासात अजरामर होईल यात काहीच शंका नाही. ●

अनुक्रमणिका

# १५ जुलै १९६८ नोंदणी बंद
# या संधीचा आजचा फायदा घ्या

## स्वातंत्र्यवीर सावरकरलिखित
## ४० रुपयांचे ग्रंथ १९ रुपयांत !

## १८५७ चे स्वातंत्र्यसमर

सावरकरलिखित मूळ मराठी प्रत

चाररंगी मुखपृष्ठ : **स्वस्त आवृत्तीची किंमत** ७.५०

मूळ किंमत सुमारे पंधरा रुपये

## महा सोनेरी पाने

भारताची स्फूर्तिदायक विजयगाथा

चाररंगी मुखपृष्ठ : **स्वस्त आवृत्तीची किंमत** ७.५०

मूळ किंमत सुमारे पंधरा रुपये




## काळे पाणी

रोमांचक कादंबरी

चाररंगी मुखपृष्ठ : **स्वस्त आवृत्तीची किंमत** ५.००

मूळ किंमत सुमारे दहा रुपये

**कोणतेही एक अगर तिन्ही एकत्र नोंदवा. तिन्ही पुस्तके एकाच वेळी नोंदविल्यास फक्त एकोणीस रुपयांत**

**टपालखर्च प्रत्येकी १-५०**

**आपल्या पुस्तकविक्रेत्याकडे अगर**

## मॅजेस्टिक बुक स्टॉल

**गिरगांव नाका, मुंबई ४ ● शनिपाराजवळ, पुणे २**






अनुक्रमणिका



# कलंदर

**सकाळी** उठल्यावर कॉफी पिता पिता मकरंद मनाशी काही ठरवू लागला. खुषीत आला होता. कॉफी मस्त झाली होती नि तिच्या गोड गुंगीत काही ठरवताना त्याला मजा यायला लागली. त्या गुंगीतच सायंकाळी चौपाटीवर जायचं त्यानं ठरवलं. त्या कल्पनेनंच त्याचं मन धुंद झालं. चौपाटीवरची हवा, लोकांची गर्दी, ते रिकामटेकडे टोळ-भैरव, त्या चिवचिवणाऱ्या लाडिक चिमण्या, समुद्राची फेसाळ गर्जना—— सारं सारं अवीट ! लाटेचे तुषार अंगावर आल्यावर अंग प्राजक्तासारखं कमालीचं मोहरून येतं. रमणीच्या ओठांवर अलगद ओठ टेकावेत, तसे ते गोड गोड तुषार अंगावर अलगद येऊन राहिले म्हणजे अंगावर येणारे शहारे कसे सुखद असतात! खरोखर ती अनुभवण्याचीच गोष्ट ! ——— मकरंद या विचारानं फुलून आला आणि त्यातच मश्गुल झाला. अलीकडे बऱ्याच दिवसात, दिवसात नव्हे, कित्येक महिन्यात तो चौपाटीवर फिरकला नव्हता. त्यामुळं त्याला एक प्रकारची चौपाटीवर जायची ओढ लागली ! ——— आणि सायंकाळची उन्हं कलेपर्यंत याच विचारात ! ———

* *

बस-स्टॉपवर येऊन तो रांगेत उभा राहिला. बस बराच वेळ आलीच नाही. प्रतीक्षा एकंदरीत फार कंटाळवाणी असते. प्रतीक्षा म्हणजे सहनशीलतेची परीक्षाच असते खरोखर ! तो अनुभव शब्दात जसाच्या तसा पकडता येईलच असे नाही. तास न् तास रांगेत ताटकळत उभे राहावे, बस लवकर येऊ नये, म्हणजे वाटायला लागते — रांगेत उभं राहणं म्हणजे एक तपश्चर्याच आहे ! काळ आपला अंत पाहत असतो. त्या तिरीमिरीत वाटायला लागतं — स्टॉपवर वाट पाहत उभे राहणाऱ्या प्रवाशांसाठी आरामशीर बाकं कां ठेवली नाहीत ?—आणि पुढं त्याहि अवस्थेत मन विनोद करतं, बस-कंपनीनं प्रत्येक स्टॉपवर छोटी छोटी होटेलं कां उघडली नाहीत ? उघडील तर बरं ! मग उतारूना उशीराचं काही वाटणार नाही —

असाच रांगेत तो उभा होता. पाय दुखायला लागले. त्याना विश्रांति देण्या-साठी पायाना लेण्यातील शिल्पांप्रमाणे निरनिराळे पवित्रे देऊन पाहिले. अनेक हालचाली करून पाहिल्या. नाजुकपणं पाय झाडूनहि पाहिला. लागलेली रग कमी होईना, तेव्हा मनातल्या मनात नशिबाला एक झक्कास शिवी दिली नि चडफडत उभा राहिला.

शेवटी एक कंटाळलेली बस आली. पण कंटक्टरनं हात दाखवून त्याला थांबवलं. विस्तवातला कोळसा तडतडावा तसा तो तडतडला. दुसरी, तिसरी बस घंटी बडवून स्टॉपवर न थांबता तशीच पळाली. सारे प्रवासी एकमेकांकडं पाहून उगाच चिडचिडले नि शिव्या देऊ लागले ! आणि मग गंमत अशी की, एकामागून एक लागोपाठ तीन बसेस आल्या. प्रवासी चढले. मकरंद तसाच चढला. त्याचं लक्ष कुठंच नसल्यासारखा. दाणदिशी एका सीटवर बसला. मनातल्या क्षोभामुळं त्याला कशाचंच भान नव्हतं.

"ऑपेरा हाऊस !" त्यानं पैसे काढून दिले नि कंटक्टरनं दिलेलं तिकीट खिशात अस्ताव्यस्त कोंबलं. तेवढ्यात त्याला

भी. गो. जांबळे



अनुक्रमणिका

इतक्या दिवसात या अफाट मुंबापुरीत एक नवरा मिळू नये, सापडू नये अं ! गंमत आहे बुवा. अन् पुणं काय ओस पडलं होतं ! अगदी गंमतच !!

आपल्या हातावर काही गुळगुळीत आहे, असं वाटलं. त्यानं उजवीकडं वळून पाहिलं.

एक तरुणी ! — आपादमस्तक त्यानं तिला पाहून घेतलं. त्याला राहवलं नाही. तो बोलला,

"ये देखो ! तुम्हारा जो यह अश्वलांगूल याने अश्वपुच्छ है, हमे परेशान कर हा है—"

तिचं बाहेर लक्ष होतं. त्याचं बोलणं तिच्या कानावर गेलं नाही. पुन्हा तो म्हणाला,

"अजी ! अजी !"

"मला काही म्हणालात ?" ती वळून म्हणाली.

"मराठी येतं तर !"

"म्हणजे ?— मी मराठी आहे !"

"ते कसं कळावं ? मराठीपणाचं काय चिन्ह आहे आपल्याजवळ ? —— माफ करा हं ऽ असं बोललो म्हणून —"

"बरं, — काय म्हणत होतात ?"

"मी म्हणत होतो, हे जे तुमच्या डोक्या-वर अश्वलांगूल – अश्वपुच्छ बसलं आहे–"

"म्हणजे ? ——"

"ही आपली 'पोनी टेल्' केशरचना !"

"असं, असं ! अश्वपुच्छ –, अश्वलांगूल! चांगले शब्द आहेत–" ती खुषीनं किंचित् हंसली.

"त्याबद्दल मला प्रशस्तिपत्र नको आहे ! — मी असं म्हणत होतो, हे तुमचं अश्वपुच्छ आमच्यावर चढाई करत आहे— हें पाहा, हे पाहा ! अंगावर कसं ऐसपैसपणं फिरत आहे. आम्हाला परेशानी वाटते."

"मग ?"

"जरा आवरा ते, एवढंच !"

यावर ती काही बोलली नाही. पर्समधून काळा चष्मा काढला. डोळ्यावर चढवला. मकरंदला त्यातून आपादमस्तक न्याहाळू लागली.

"आता कसं ! खुशाल बिनदिक्कतपणं डोळे उघडे ठेवून नीटपणं पाहून घ्या. कुणाला काही वाटणार नाही. संशय येणार नाही. आणि ही तुमची युक्ति कोणाच्या डोळ्यावर येणार नाही. समजलं ?" असं तो मनातल्या मनात म्हणाला.

"हे पाहा, एक समोर तरी पाहा, किंवा माझ्याकडं तरी पाहात राहा; म्हणजे या अश्वपुच्छाचा आम्हाला त्रास होणार नाही–"

"बराच आहे की !" ती मनातच म्हणाली. काय बोलावं हेच तिला समजेना. उत्तरच जमेना. काहीशी गोंधळात साप-डल्यासारखी झाली.

"ऑपेरा हाऊस !" बस-कंडक्टरनं पुकारा केला.

ती उठली.

"मी इथं उतरणार आहे !"

त्यानं वाट दिली.

त्याला इथंच उतरायचं होतं. तिच्या पाठोपाठ तो पण उतरला.

* *

मकरंदनं झकास जागा शोधून काढली. विरळ गर्दी नि वर्दळही बेताचीच. त्याला बरं वाटलं. समुद्राकडं तोंड करून तो आरामात बसला. पाण्यावरून लांबवर दृष्टि टाकली. लाटा कशा एका लयीत किनाऱ्याकडं येत होत्या. अवखळपणानं धावत येणारं मूल आईच्या मिठीच्या आवाक्यात येतं तेव्हा ते जसं धडपडतं, तशा त्या लाटा किनाऱ्याकडं येताना दिसत होत्या, आणि मग शतशः चूर होत होत्या — जणु काही आईच्या गोड मिठीत आपलं अस्तित्व नाहीसं करीत होत्या.

तुषारांच्या गोड गारव्यानं मकरंद शहारला. मस्तपणं आपल्याशीच हसला. वाळूत वाकडी–तिकडी बोटं फिरविली. लहान मुलाप्रमाणं वाळू वर हवेत उधळली. अगदी लहान मुलासारखं खदखदला,— वाळूत लोळावंसं त्याला वाटलंही म्हणून तो आकाशाकडं तोंड करून वाळूत पसरला. कसल्या संकोचानं त्यानं भवताली पाहिलं. कोण आपल्याकडं पाहतंय की काय, पाहील की काय ! — त्याचा वाळूत लोळायचा बेत कुठल्या कुठं पळाला. उठून बसला. त्यानं कुठं दृष्टि लावली नि अस्फुट उद्गारला : "अरेच्या ! ही पण इथंच ?"

. . . बुढ्ढा मिल गया

बुढ्ढा मिल गया . . . . .

तिचा ट्रान्झिस्टर रडत होता.

मकरंद भडकला. पुढं गाण्याचा शब्द उमटायच्या आत तो तिच्यापुढं घुसफुसत जाऊन उभा राहिला.

"आधी बंद करा तो ट्रान्झिस्टर ! — बंद करा म्हणतो ना ——" तो खसकन् तिच्यावर ओरडला.

ती त्याच्या ओरडण्यानं किंचित् भेदरली. घाबरली. डोळे किलकिले करून त्याच्या-कडं पहात ती आश्चर्यानं म्हणाली, "कां हो ?"

ट्रान्झिस्टर बंद झाला होता.

"हे काय गाणं आहे ?"

"मग काय आहे ?"

"काय आहे ते मला माहित नाही. पण गाणं खास नव्हे–" आवाज उतरवून तो म्हणाला, "माफ करा हं, मला राग आला — तोल सुटला — "

ती तशाच नजरेनं तशीच त्याच्याकडं पाहत राहिली.

"—— हे असलं काही ऐकू आलं, की मला राग येतो. मन खवळतं. भान राहत नाही. लागावेत असे शब्द तोंडून येतात."

"मला गंमत वाटली तुमची. मी अशी

"बरं, कमलाबाई ! आता मी कॉफी करायला जातो— आराम करा."

"कमलाबाई ?— बराच आहे की!" ती मनाशी म्हणाली आणि तिला मनाशी म्हटलेल्या वाक्याचं स्वतःशीच हसू आलं.

तिच्या दृष्टीपुढं शून्यं शून्यं भिर-भिरायला लागली. ती अस्वस्थ, विमनस्क झाली. काहीतरी राहिल्यासारखं तिला वाटायला लागलं. ती उठली. खोलीभर दृष्टि फिरवून पाहिलं. खोली खूप रसिकतेनं सजवली होती. ती पाहात पाहत ती हिंडू लागली. सजावटीतील रसवत्ता तिला जाणवली. आवडली.—— पण प्रसन्न होत चाललेल्या मनाला काही राहिलं ते गवसेना;— आणखी काय काय आहे ते ती पाहू लागली. काचेच्या एका छोटया अलमारीकडं ती गेली. पुस्तकं — गोष्टी, कादंबऱ्या, नाटकं: इंग्रजी – मराठी. आपटे, फडके, खांडेकर, शरदबाबू, टॉलस्टॉय, गोर्की, आणखीन् नवे . . . कितीतरी. रहस्यकथादेखील —— मराठी नि इंग्रजी.

तिनं एक पुस्तक उचललं. उलगडलं. 'मकरंद जोशी'! सापडलं— सापडलं! राहिलं ते सापडलं ! हेच ती विसरून राहिली होती— इतकी मैत्री जुळून आली — पण आपण त्याचं नांव विचारा-यचं विसरलो हेच ती विसरून गेली होती. तेच तिला आठवत नव्हतं. त्यामुळं काही राह्यलं असं तिला वाटत होतं. ती काता-वल्यासारखी झाली होती.

"मे आय् कम् इन् ?"

"मराठी बोला—" मकरंद वळून म्हणाला.

"येऊ आत ?"

"परवानगी कशाला पाहिजे ?"

पुढे केलेल्या पाटावर बसता बसता तिथं.ी तिनं सर्वभर नजर फिरवून पाहिलं.

"कसं वाटलं घर ?"

"छान आहे की ! पण . . ?"

त्यानं तिच्याकडं वळून पाहिलं. म्हणाला, "पण म्हणजे ?"

"याला परतत्त्वाचा स्पर्श झालेला दिसत नाही !——"

"म्हणजे ?"

"म्हणजे घरात बाई माणूस दिसत नाही. स्त्रीच्या स्पर्शाशिवाय घराला घरपण येत नाही. त्याला उजाळा येत नाही, त्यात चैतन्य असत नाही. तुमची मंडळी ?–"

"मंडळी नाहीत.——"

✽✽

गाणं संपल्यावर ती उद्गारली, "झकास! मस्त! "

"—तरी तुम्हाला असं ऐकविण्यात मला समाधान नाही. तबल्याची साथ असती तर कळलं असतं गाणं म्हणजे काय ते! — उद्या सकाळी या—माझा रियाज चालतो दररोज सकाळच्या रामप्रहरी. तबलजी असतो. अशी रंगत भरते. . .!"

"असं ? मी येईन. मला खूप आनंद झाला तुमचं गाणं ऐकून—"

ती जायला निघाली. दरवाजापर्यंत तो

चीड पाहिली नाही. मला काही वाटणार नाही."

"मग काही हरकत नाही !"

"वसा ना —"

वसता वसता तो म्हणाला, "तुम्ही तसलं गाणं ऐकत होतात. तुम्ही त्याच्या आनंदात होता. . . . मला राहवलं नाही. मी रसभंग केला. तुमचा आनंद हिरावला. . . . तुम्हाला गाणं ऐकायचं आहे ?"

अरे ! हा मनुष्य काय आहे ! –असं तिचं कुतूहल वाढतच राहिलं. तिला काय बोलावं हे कळेना.

"मी वाजवून दाखवली असती —" तो आपली बासरी दाखवीत म्हणाला, "पण लोक जमतील.— नको ! मला रसिक श्रोता हवा."

"म्हणजे माझी परीक्षा घेताय् की काय ?"

"मी कोण घेणार परीक्षा ?"

"नाही तरी तुम्ही माझी परीक्षा केलीच!" ती मोकळेपणानं बोलू लागली.

"ते तुम्ही काय ते समजा — उमजा."

"बरेच आहात की !"

"काय केलं ?"

"बोलण्यातली कुशलता आम्हाला कळते. — मघाशी बसमध्ये देखील तुम्ही माझं तोंड बंद केलंत; तेव्हा देखील मी 'बराच आहे की !' असं मनात तुमच्याकडं पाहून म्हणाले."

"काळा चष्मा घालून ——"

"माझ्या काळ्या चष्म्याचं गुपीत तुम्ही ओळखलंत तर –" ती गोड हंसून म्हणाली.

"हो. आम्ही देखील तरुणच आहोत की !" तो चांगला खदखदून हसला.

"बरं, ते असू दे. — खरंच, तुम्हाला गाणं येतं ?"

"हो. ऐकायचं आहे ?— घरी येत असाल तर ऐकवीन."

"होऽऽ ! ऐकवाल ते ऐकीन. मला आवड आहे."

"मग चला तर. ती पाहा बस येत आहे. या समोरच्या स्टॉपवर थांबेल. आपण थोडं पळू तर ती आपणाला मिळेल-"

ती उठली.

"चला, – पळा – पळा."

आणि तो तिच्या हाताला धरून तिला पळवत न्यायला लागला.

"अहो, अहो ! मी पडते."

"नाही पडत, नाही पडत ! मी चांगलं घट्ट धरलंय—निसटणार नाही हातातनं हात !"

ती बसमध्ये बसल्यावर जोरजोरानं धापा टाकायला लागली.

"दम लागला !"

"किती जोरानं पळालो आपण."

"तुम्ही तर मला फरफटतच आणलीत —"

"—— म्हणून बस मिळाली !"

"हो ऽ !"

कंडक्टरनं दिलेली तिकिटं खिशात ठेवता ठेवता त्यानं तिच्याकडं पाहिलं. म्हणाला, "आता तो काळा चष्मा लावू नको. मघाशी काळ्या चष्म्याआडून पाहून घेतलंत. आता उघड्या डोळ्यानी खुशाल पाहून घ्या ——"

"बरेच आहात की !"

"असं म्हणायची ही तुमच्यावर तिसऱ्यांदा पाळी आली !"

"दोस्ती फार लवकर जमवलीत !"

**

"आपण फार दमलो. थोडी विश्रांति घेऊ. कॉफी करतो ती घेऊ—मग गाणं–"

तो घरात शिरताना तिला म्हणाला, "चालेल ना ? तुम्हाला घरी जायची फारशी घाई —"

"नाही !"

"मग हरकत नाही. बसा."

ती कोचावर बसली. तिनं खोलीभर पाहून घेतलं.—— तिला शून्यात फिरल्या-सारखं झालं. तिला काही कळेना. ती स्वतःत मग्न झाल्यासारखी झाली.

"आपलं नांव ?" अंगातली लखनवी काढता काढता तो म्हणाला.

"कमल."










तिला पोचतं करायला गेला. निरोप घ्यायसाठी तिनं त्याच्याकडं पाहिलं, तेव्हा तो म्हणाला,

"खरंच, तुम्ही म्हणाला ते सत्य आहे. या घराला परतत्त्वाचा स्पर्श नाही. पण त्याला नाईलाज आहे. आमचं आयुष्यच कलंदर! लहरी! आमच्या सहवासात कुणाला सुख लाभायचं नाही. कुणी सहवासात येईल तो कंटाळून जाईल...गाण्याच्या नादानं, वेडानं असं भरकटलो. त्या दिवसातल्या सवयी अंगाला चिकटल्या....... तशाच अवस्थेत शिक्षणाची कड कशी तरी गाठली.......पदवी परीक्षा पदरात पाडून घेतली. नोकरी करण्याचा प्रयत्न केला; पण तिचं आमचं सूत जमेना. —माझ्या आईला माझी फार काळजी वाटते. माझ्यापासून तिला कष्ट पडू नयेत, तिचे हाल होऊ नयेत, म्हणून मीच तिला म्हणालो, 'माझा तुला त्रास होईल, कंटाळा येईल. मला तो बघवायचा नाही; तू आपली दादाच्या बरोबरच राहा–"

"वा! बोलताही किती छान!"

"अहो! फार प्रशस्तिपत्र देता बुवा तुम्ही—''

"हं ऽ, पुढं?"

"——ही जागा भावाची. त्याची बदलीची नोकरी. इथं या चार भिंतींच्या आत गाण्याच्या मस्तीत आम्ही राहातो, पैशाची फिकीर नाही. कार्यक्रम होतात, मिळेल त्यात मजेत आहो आम्ही! मग आमच्या या अशा आयुष्याचा मोह कुणाला कसा वाटावा? —खरं आहे की नाही? अशा आमच्या कलंदर जीवनाचे हाल सोसणारी, ते गोड मानणारी मनासारखी मुलगी आम्हाला कुठून भेटणार?–आम्ही कुठून बोहल्यावर चढणार?—"

या त्याच्या बोलण्यावर ती खुदकन् हंसली. तो चमकून म्हणाला,

"कां हसलात?"

"तुम्हाला विनोद पण चांगला करता येतो की!—"

"हा विनोद? —अहो, हे आमच्या जीवनाचं भीषण चित्र आहे!–आणि तुम्ही याला विनोद म्हणता?—कमाल आहे बुवा! —अहो, माझ्या आईला माझ्या लग्नाची फार काळजी. म्हणते, 'तुला कसली बायको मिळते देव जाणे बाबा! विच्चारीचे तुझ्या संगतीत हालच!' –पण मला त्याची फिकीरच वाटत नाही.——"

"ती कशी?"

"तेवढ्यासाठी मी माझ्या आनंदाला मुकायला, गमावायला तयार नाही!" तो थांबला.

तीही बोलली नाही.

"लांबलचक व्याख्यान दिल्यासारखं माझं मलाच वाटतंय,—कंटाळा आला? कुठून ही 'बला' असं वाटलं असेल, नाही?—"

दुसरे दिवशी सकाळी ती उत्सुकतेनं, आतुरतेनं, मकरंदच्या घराकडं आली. तिच्यासाठी त्यानं दरवाजा उघडल्यावर तो तिला म्हणाला,

"अगदी वेळेवर आलात—"

"म्हणजे?"

"कॉफीला स्टोव्हवर पाणी ठेवलंय."

आणि ती दोघं एकदम सैंपाकघरात गेली.

कॉफी घेता घेता तो तिला म्हणाला,

"एक विचारू?"

तिनं नजर वर केली.

"घाबरू नका. कादंबरी–गोष्टीतल्यासारखा प्रश्न नाही—"

"विचारा."

"मी सांगलीला शिकायला होतो, तेव्हा माझ्या वर्गात सुरेश देशपांडे म्हणून माझा एक जानी दोस्त होता——अगदी त्याच्यासारखा तुमचा चेहरा आहे.——तुम्हाला बसमध्ये पाहिल्यापासून सारखा विचार करतो आहे, रात्रभर तोच विचार.—मला स्मरेना."

"अहो, मी त्याचीच बहीण!"

"अरेच्या! काय योगायोग! आता सुरेश असतो कुठं, काय करतो?"

"पुण्याला असतो. मोठ्ठा इंजिनियर झाला आहे——"

"शाळा सुटल्यास एकमेकांचा एकमेकाला पत्ता नाही. आम्ही गाण्याच्या वेडानं असं भरकटलो—शाळेतल्या त्या आठवणी आल्या की मन बहरून येतं–"

अशीच ती दररोज गाणं ऐकायला त्याच्याकडं येत होती. तो एक दिवस तिला म्हणाला, "राग नाही येणार?"

"नाही."

"विचारावं, न विचारावं–मी इतके दिवस विचार करत होतो. जीव विचकत होता. घाबरत होतो. विचारायला वजावत नव्हतो."

"खुशाल विचारा. तुमचं आपलं काहीतरीच!"

"पुण्याहून तुम्ही इकडं कशाला आलात?"

"आम्ही सध्या वरसंशोधनाच्या मोहिमेवर आहो. दोन-चार महिने होत आले मला इथं आल्याला. माझे मामा असतात इथं."

"बरीच मोठ्ठी मोहीम दिसते! वा: –छान!—पण, राग येणार नाही म्हणालात म्हणून अधिकच विचारतो हो!—"

"विचारा, विचारा! हरकत नाही—" ती त्याच्या गंमतीदार बोलण्यावर हंसली.

"——आणि इतक्या दिवसात या अफाट मुंबईत अजून एक–एक नवरा सापडू नये?—गंमत आहे बुवा! आणि पुणं काय ओस पडलं? गंमतच!!"

आणि यावर दोन तीन दिवस गेले नसतील, तेव्हा ती विषण्णतेनं म्हणाली, "तुमचा आमचा सहवास आता फार दिवस नाही. मी लौकरच पुण्यास परत जाणार!—"

"वा! आनंद आहे. मोहीम सफल झालेली दिसतेय्—"

"अंऽऽहं!"

"अरे—रे! च्–च्!"

आणि तिच्या डोळ्यात ढग जमायला लागले.

"असं काय बरं?" त्याला आपल्या उद्‌गाराचं कससंच झालं.

ती दुसरे दिवशी आली तीच विषण्ण चित्तानं. त्यानं रागरंग ओळखला. बोलायच्या भरीस पडला नाही.

तंबोरा लावून सुरुवात केली.

तबला खणाणला.

"शर लागला तुझा गे——

बघ जीव झाला वेडा!"'——"

दोघंही रंगली. रंगात बुडाली. कधीच भरला नव्हता इतका रंग आज भरला... कुठून नि कसा?——

●●●












## एक मळलेली चादर

**नाटके**, चित्रपट, प्रदर्शने आपण नेहमीच पाहत असतो. त्यावर लिहीत असतो, चर्चा करीत असतो. बरेवाईट काय, कलावंताचे कुठे चुकले याबद्दल क्वचित् घाईने, क्वचित् आवेशाने, अन् बहुधा नेहमीच सर्वज्ञाचा आव आणून मते व्यक्त करीत असतो. असे हे सारखे करीत राहिले की आपल्या संवेदना हळुहळू बोथट होत जातात. सवयीने आपल्या प्रतिक्रियांची तीव्रता कमी होत जाते. प्रतिकूल मतांना मुरड पडत जाते, आणि हळुहळू, स्वतःला नकळत, जे हिणकस तेसुद्धा आपण श्रेयस्कर मानू लागतो. हे सारे कसे नि केव्हा होते हे आपल्याला कळतदेखील नाही !

आणि अचानक, हे असे चाललेले असतानाच, एक दिवस अशी एक कलाकृती आपल्याला सामोरी येते की जी आपले अवघे अस्तित्व, आपले व्यक्तिमत्वच मुळापासून हादरवून टाकते. ती पाहून कितीही काळ लोटला तरी तिच्या पहिल्या दर्शनाने निर्माण झालेली ही कंपने आपल्या अंगांगातून जणु सूक्ष्मपणे थरथरतच राहतात. सत्यजित राय यांचा पहिलावहिला चित्रपट 'पथेर पांचाली' ही एक अशी कलाकृती. शंभू मित्र व त्यांची पत्नी तृप्ती यांचे रंगमंचावर झालेले पहिले दर्शन हे अशाच प्रकारचा परिणाम घडवून गेले. दीर्घ आजारानंतर जेव्हा कुमार गंधर्वांचा पुनर्जन्म झाला त्यापाठोपाठ दोनएक वर्षांनी ऐकलेले त्यांचे गाणे असाच प्रत्यय देऊन गेले.

काही आठवड्यांपूर्वी रंगमंचावर पुन्हा एकदा असा साक्षात्कार घडविणारे नाटक पाहावयास मिळाले. इंडियन नॅशनल थिएटर या मातब्बर संस्थेने यंदा आपल्या सुवर्ण महोत्सवी वर्षात पदार्पण केलेले आहे. त्यानिमित्ताने तिने राजिंदर सिंग बेदी या सुप्रसिद्ध पंजाबी हिंदी लेखकाचे 'एक चादर मैली सी' हे नाटक रंगमंचावर आणले. आय्. एन्. टी. सहसा गुजराती नाटकेच बसविते; हिंदी रंगभूमीवर नाव कमाविलेल्या एखाद्या निर्मात्याने म्हणण्यासारखे चांगले नाटक रंगमंचावर सादर करावयाचे ठरविले तर आय्. एन्. टी. आपली भक्कम यंत्रणा सर्व प्रकारच्या आर्थिक साहाय्यानिशी त्या निर्मात्याच्या पाठी उभी करते. बेदीसाहेबांच्या नाटकात इतकी पात्रे आहेत की असे पाठबळ मिळाल्याशिवाय त्याचा प्रयोग होणे कठीणच.

### नाटकाचे कथानक

बेदीसाहेबांचे हे नाटक १९६१ साली प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या स्वतःच्याच कादंबरीवर आधारलेले आहे; त्या काळी साहित्य अकादमीचे पारितोषिक तिला मिळून तिचा यथोचित गौरव झालेला आहे. नाटकाची रचना कादंबरीतील प्रकरणांबरहुकूम, छोट्या छोट्या प्रवेशांद्वारे केलेली आहे. पंजाबातील कोटला नावाच्या गावी, माझ्या समजुतीप्रमाणे फाळणीच्या पूर्वी, नाटकाचे कथानक घडते. राणो नावाच्या गृहिणीची ही कथा आहे. कादंबरी जरी छोटीशी असली तरी राणोच्या जीवनातील काही मूलगामी स्थित्यंतरे तीत आपल्याला दिसतात.

राणोचा नवरा तिलोका हा गावाच्या परिसरात आपला एक्का (टांगा) चालवून कसाबसा एका मोठ्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवीत असतो. घरी त्याचा म्हातारा बाप, आई, धाकटा भाऊ मंगल आणि चार मुले एवढी माणसे. राणोची मोठी मुलगी बडी ही वयात आलेली; तिच्या पाठोपाठ शाळेत जाणाऱ्या वयाचे दोन जुळे मुलगे अन् त्यानंतर अंगावरचे एक तान्हे मूल.

गावातल्या देवळाजवळ हे कुटुंब राहात असते. यात्रेला आलेली एखादी बाई वाट चुकली की तिला या देवळात आणून दाखल करणाऱ्यांची गावात एक टोळी असते. तिथे ती एकदा पोचली की देवळातले महंत वगैरे तिच्या शीलाचे जे काही भलेबुरे करीत त्याचा बाहेर पत्ता लागत नसे ! एकदा राणोचा नवरा तिलोका



--ज्ञानेश्वर नाडकर्णी

आपल्या एक्क्यातून आलेल्या अशाच एका तरुण मुलीची रवानगी त्या देवळात करतो. त्याचा सूड म्हणून त्या मुलीचा भाऊ संधी साधून तिलोकाचा मुडदा पाडतो.

तिलोकाचे प्रेत घरी आणतात हा या नाटकातील एक हृदयविदारक प्रसंग. ॲरिस्टॉटलने आपल्या नाट्यशास्त्रात पूर्वापार काळी असा एक दंडक घालून दिलेला होता की प्रत्यक्ष रंगमंचावर मृत्यूची घटना न दाखविता तिचे फक्त कथन केले जावे ! आपल्याकडेही रंगमंचावर प्रेत आणणे हे नाटककाराना तितकेसे पसंत नाही (अन् त्याबाबतचा अलीकडच्या काही नाटककारांचा अनुभव तितकासा दिलासा देणारा नाही— अर्थात् भुते याला अपवाद !) 'एक चादर मैली सी' या नाटकाचे वातावरणच मात्र अथपासून इतिपर्यंत वास्तववादाने असे काही भारलेले आहे की वरील प्रसंग वावगा वाटत नाही; उलट त्यावेळचा राणोच्या भूमिकेतील दीना पाठक यांचा अभिनय हृदय विदीर्ण करतो.

तिलोकाचे प्रेत गावकरी आणून घरात ठेवतात तरी काही काळ राणोच्या डोळ्यातून अश्रू फुटत नाहीत. संसारात तिलोकाने तिला फारसे सुख दिलेले नसते. अलीकडे तर त्याचे नशापाणी वाढलेले असते. त्यात आणखी ज्यामुळे त्याचा खून झाला त्या प्रकारच्या पापाचरणाची भर ! आपल्यासमोर आपल्या नवऱ्याचे प्रेत पडलेले आहे याची पुरती जाणीव राणोला व्हायला काही वेळ लागतो. तोवर तिची सासू तिला मारपीट करून "अग, रड ! रड !" असे तिच्या अंगावर खेकसतात ! अखेर राणो भानावर येते आणि तिलोकाच्या अंगावर कोसळून पडते.

## पंजाबातले ग्रामजीवन

बेदीसाहेबानी आपल्या कादंबरीत व नाटकात केलेले पंजाबी ग्रामजीवनाचे अवघे चित्रणच इतके प्रत्ययकारी व जळजळीत आहे की असले प्रसंग त्यात चपखलपणे बसतात. भारतीय लोकजीवनाच्या मूळ गाभ्यालाच हात घालणारी आणि त्या जीवनातील अनोख्या सुखदु:खांचे इतके समर्थ व साक्षात्कारी दर्शन घडविणारी कलाकृती भारतीय साहित्यात आपल्याला क्वचितच दिसते.

राणो विधवा झाल्यावर सबंध कुटुंबाची जबाबदारी पेलणे तिला कठीण जाते. तिचा धाकटा दीर मंगल आता एक्का चालवू लागतो व दररोज काही पैसे आणून तिच्या हातावर ठेवू लागतो. राणोच्या कुटुंबाची वाताहत होऊ नये म्हणून गावची पंचायत असा तोडगा काढतात की राणोने मंगलबरोबरच लग्न करावे ! राणोला अर्थातच हे पसंत नसते, परंतु आपल्या भोवतालच्या माणसांचा सारासार विचार करून ती या दिव्याला तयार होते. मंगलचे प्रेम गावातल्या एका मुलीवर असते, अन् ज्या दिवशी गावपंचायतीने लग्नाचा घाट घातलेला असतो त्याच दिवशी तो पळून जाण्याचा प्रयत्न करतो. गावकरी त्याला पकडून आणतात आणि मारपीट करून बोहल्यावर बसवितात ! पंजाबी प्रथेला अनुसरून अंतरपाटाऐवजी वधूवरांच्या डोक्यावर एक चादर धरली जाते. हीच ती बेदीसाहेबांच्या नाटकाच्या नावातील 'चादर'; ती मलिन आहे कारण बाह्यत: हा विवाहच असा राणोच्या पूर्वेइतिहासाने डागळलेला आहे.

## विचित्र प्रसंग

परंतु यानंतरच्या प्रसंगातून बेदीसाहेब आपल्याला राणोचे एक वेगळेच, विराट दर्शन घडवितात. सुरुवातीला मंगलचे अर्थातच संसाराकडे लक्ष नसते; परंतु तिलोकाच्या पश्चात् उध्वस्त झालेल्या आपल्या कुटुंबाला नव्याने पाळेमुळे लाभावीत म्हणून ज्याला त्याच्या लहानपणी आपल्या मुलाप्रमाणे वागविले त्याच मंगलला राणो लाडीगोडीने आपल्या शयनमंचकावर ओढते. त्याच्यापासून तिला गर्भ राहतो. भारतीय स्त्रीचे इतके भव्योदात्त चित्रण आपल्या कथाकादंबऱ्यात क्वचित्च पाहावयास सापडते ! त्याग आणि भोग यांच्या ज्वालातून पूर्णपणे तावूनसुलाखून निघणारी ही राणो आपल्या मनात एक प्रत्ययकारी स्वभावचित्र म्हणून ठसून राहते आणि सौ. पाठक यांनी तिच्या स्वभावाची ही सारी अंगप्रत्यंगे, तिच्या व्यक्तिमत्वातील अवघी स्थित्यंतरे फारच प्रभावीपणे रंगमंचावर साकार केलेली आहेत.

राणोची अलौकिकता येथेच संपलेली नाही. मध्यंतरी तिची सासू पैशाच्या आशेने आपल्या नातीचे—बडीचे—लग्न एका वेडगळ नवऱ्या मुलाशी करू पाहते तेव्हा राणो खंबीरपणे तिला विरोध करते. पुढे तिचे सासूसासरे यात्रेहून गावी परत येतात, त्याच सुमाराला मंगल अशी बातमी आणतो की बडीला मागणी घालण्यासाठी एक तरुण गावात येत आहे अन् तो सर्वदृष्टचा तिला अनुरूप असा वर आहे ! राणोच्या आनंदाला पारावार राहात नाही; परंतु प्रत्यक्षात बडीला मागणी घालणारा तो तरुण निघतो तिलोकाचा खुनी ! आपल्या कृत्याबद्दल तुरुंगवास भोगून तो परत आलेला असतो आणि गुडघे टेकून, राणोची करुणा भाकीत, तिच्या मुलीला मागणी घालीत असतो !

## अगतिक 'राणो'

प्रथम राणो खवळून उठते ! आपल्या नवऱ्याचा ज्याने खून केला त्याच्याशीच आपल्या मुलीचे लग्न लावायचे ही कल्पनाच तिला असह्य होते. त्या तरुणाने केवळ आपल्या वहिणीच्या बेअब्रूचा बदला म्हणून तिलोकाचा खून केला असे त्याच्या वतीने तिला सांगितले जाते; शिवाय केल्या कृत्याचा त्याला आता पूर्णपणे पश्चात्ताप झालेला आहे अशीही त्याच्या वतीने रास्तपणे रदबदली केली जाते. परंतु राणोला तरीही लग्नाचा विचार सहन होत नाही. अखेर तिचा म्हातारा सासरा त्या तरुणाच्या वतीने तिच्या क्षमाशीलतेला आवाहन करतो: "बहू ! तू किसे रोती है ?. . . . मेरी तरफ देख, जिसने बेटा दिया है, हमेशा बेटा दिया है, तब कहीं जाके एक बेटा पाया है. . . . "

मन घट्ट करून राणो आपले दु:ख गिळते. ज्या सारासार विचारापोटी तिने मंगलशी मारूनमुटकून झालेल्या आपल्या विवाहाची पूर्तता केली त्याच सारासार विचारापोटी ती आपल्या नवऱ्याच्या मृत्यूला कारण झालेल्या पश्चात्तापदग्ध तरुणाला जावई म्हणून घरात घेण्याचे मान्य करते. सबंध नाटकाच्या आशयाला या अखेरच्या घटनेमुळे एक आगळीच पूर्णता लाभते. ॲरिस्टॉटलने ज्या 'कॅथार्सिस'च्या भावनेचा उल्लेख केलेला आहे तिचा अतिशय उत्कट असा प्रत्यय प्रेक्षकाला येतो.

कथानकातील या प्रमुख घटनांच्या पिछाडीला कोटला गावातील लोकांच्या दैनंदिन जीवनाचा सूक्ष्म तपशील बेदीसाहेबानी उभा केलेला आहे. रंगमंच अक्षरश: या गावच्या छोटचामोठ्या लोकानी, एक्केवाल्यानी, जमीनदारानी, पंचायतीच्या सभासदानी, गावकऱ्यानी, पोरीबाळीनी अन् म्हाताऱ्या–कोताऱ्यानी गजबजलेला आहे. एम्. एस्. सत्यू यानी उभारलेल्या नेपथ्यात सुलभपणे राणोचे घर, त्याचा परिसर आणि गावातील इतर स्थळे यांचा वास्तव आभास व्हावा अशी व्यवस्था होती. प्रवेश बदलण्यासाठी एका लांबट पांढऱ्या पडद्याचा आडोसा वापरण्यात येई; तो नजरेला खटकला तरी सबंध प्रयोगाला अशी काही गति होती की अखेर या दोषाची आठवणही मनात राहिली नाही. सत्यूनी उभ्या केलेल्या भिंतीना खऱ्याखुऱ्या भिंतींचा पोत होता. रंगमंचाच्या दोन्ही अंगाना पायऱ्या वापरून भिन्न पातळयासुद्धा त्यानी कल्पकपणे उपयोगात आणल्या होत्या. पिछाडीला एक एक्का दोन चाकावर ठामपणे उभा करून त्याचाही अधूनमधून वास्तववादी पद्धतीने वापर केलेला होता.

( पृष्ठ ५६ वर )

## पुन्हा एक 'केनेडी' जातो

**जगातल्या** प्रथम श्रेणीच्या एका राष्ट्रातला एक सुप्त सैतान सध्या मोकाट सुटला आहे. माणसासाठी सारी ऐहिक सुखे उपलब्ध करून देण्याची क्षमता बाळगणाऱ्या ह्या देशातला मानवच एकटा पडला आहे. चंद्राच्या जवळ जाऊन त्याचा वेध घेणारांच्या ह्या देशात तूर्त ज्वालामुखीने पेट घेतला असून चांगल्या चांगल्या माणसाना टिपीत हा ज्वालामुखी आपली आग शमवीत फिरतो आहे. 'राजकीय हत्या' हा त्या देशावरचा कलंक आज प्रगत झाल्यावरही धुवून गेलेला नाही. कल्याणकारी लिंकनचा खून होतो. मानव—मित्र जॉन केनेडीची हत्या होते. नागरी हक्कासाठी अवघे जीवन शांतपणे कारणी लावणाऱ्या मार्टिन लूथर किंग यांचा खून होतो आणि दिवसाढवळ्या आता विजयाच्या वाटेवरच्या रॉबर्ट केनेडीना गोळ्या घालण्यात येतात. जगाला हादरे देणाऱ्या ह्या घटना! पण ह्या घटना एकाकी वाटल्या तरी तशा त्या नसतात. कुणावर तरी खटला भरला जातो. कुणाला तरी शिक्षा होते. राजकीय हत्यांची गुपिते पुष्कळदा उलगडली जातातच असे नाही. किंबहुना 'राजकीय हत्या' ही शासकीय पक्षाची 'सोय' म्हणून होत असतात. आणि ती 'सोय' पाहण्यासाठीच 'धूर्त' खटले भरले जातात. शिक्षेचा फार्स केला जातो. क्वचित प्रसंगी खटल्याआधीच तथाकथित आरोपी आत्महत्या करतो वा त्याचा खून तरी केला जातो. मग त्या मागोमाग सारीच गुपिते 'गुपितच' राहतात. नष्ट होतात असे मी म्हणत नाही. अमेरिकेचे माजी अध्यक्ष जॉन केनेडी यांच्या मृत्यूला कारण झालेल्या ओस्वाल्डचा खून जॅक रुबीने केला. पुढे तोही मेला (की मारला ?) सारेच गूढ. वॉरेन रिपोर्ट आला तरी जॉनच्या मृत्यूचे गूढ कायमच आहे असेच अमेरिकेत मानले जाते. जगही तसेच मानते. मार्टिन लूथर किंग यांच्या खुनीला इंग्लंडमध्ये अटक झाली असल्याची



वार्ता आहे. त्याच्या भावाने असे म्हटले आहे की "पैशासाठी तो वाटेल ते करील" पण पुढे तो म्हणतो की "जे जे घडले ते ते सांगायला तो कोर्टात बसेल असे म्हणता की काय ?" यातून त्याला काय सुचवायचे आहे ? तो पळून जाईल ? आत्महत्या करील ? सत्य सांगणार नाही. येवढे प्रामुख्याने सुचवावयाचे आहेसे दिसते. आता सिनेटर रॉबर्ट केनेडी ह्यांचाही गोळ्या झाडून खून झाला आहे. कुणा सिरहान नावाच्या माणसावर खुनाचा वहीम आहे. तो जॉर्डनचा निर्वासित आहे म्हणतात. इस्राइलच्या पाठीशी उभे राहण्याची नैतिक जबाबदारी आमची आहे, असे रॉबर्ट केनेडी म्हणाले. म्हणून चिडून ह्या तरुणाने गोळ्या झाडल्या असेही म्हटले जाते. तर जॉनच्या खुनामागचे सारे (खरे) धागेदोरे मी प्रथम जमवीन असे रॉबर्ट म्हणाले म्हणून केनेडी विरोधकानी ही हत्या करविली असेही म्हटले जाते. सत्य काय ते कळेल (किंवा कदाचित मुळीच कळणारही नाही) पण रॉबर्ट केनेडीच्या हत्येने एका कर्तृत्वशाली जीवनाचा निर्घृण अंत झाला आहे खास! कर्तृत्वाला विद्वेषाचा शाप घेऊनच प्रवास करावा लागतो की काय कुणास ठाऊक ? अन्यथा आजच्या अमेरिकेचे दोन कर्तबगार शिल्पकार असे मारले गेले नसते. 'क्युबा' प्रकरणातली ह्या दोघा भावांची कामगिरी अमेरिकेच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहली जाईल येवढी मोठी आहे.

मांजरी आपली पिल्ले खाते म्हणतात. अमेरिकन मांजरी आपलीच सुंदर सुंदर पिल्ले कां बरे खात सुटली आहे ? रॉबर्ट केनेडी ह्यांचे नेतृत्व कदाचित मूलगामी बदल घडवून आणू शकले असते. भावाच्या सहवासातून व स्वयंप्रज्ञेने त्यांना फार थोर वारसा लाभला होता. एका नव्या युगाचा उदय व्हायच्या आतच त्याच्या अग्रदूताची हत्या झाली. किंग गेले, जॉन गेले, रॉबर्ट गेले, लिंकन गेले, मॉडर्न, प्रगत, अत्याधुनिक प्रथम श्रेणीची अमेरिका आज अश्रु ढाळते आहे. गूढे कायम राहतीलही. पण माथ्यावरचा कलंकही तसाच कायम राहील. माणसे येतील-जातील. मानवतेचा प्रवास चालूच राहणार आहे. पण ही 'प्रवृत्ती' सतत बाधा आणीत राहणार आहे. म्हणूनच केनेडी बंधूंचा वा किंगचा जयजयकार करताना ह्या प्रवृत्तीचा मी तीव्र निषेध



करतो. ती हत्या अमेरिकेत झाली वा मुगलसराईत झाली तरी ती सारखीच निषेधार्ह आहे. गूढ दडपण्याची प्रवृत्तीही अमेरिकन असो वा 'सत्यमेव जयते' विरुद्ध मिरवणाऱ्या भारतातली असो – तितकीच निषेधार्ह आहे असे मी मानतो. ह्या दोन्ही प्रवृत्ती म्हणजे मानवतेवरचे कलंक होत! लोकशाहीप्रधान देशात तर ते महत्पाप मानले गेले पाहिजे. साऱ्याच राजकीय हत्यांचा कलंक मिरवीत आज मानवता अश्रु गाळीत उभी आहे. ते अश्रु अखेर पुसणार कोण ?

## सौदा पेरला, सौदाच उगवला

जातीवाद ही एक विषवल्ली आहे असेच मी मानीत आलो आहे. दरडोई एक मताचा प्रखर राष्ट्रवाद मला एकदम

मान्य आहे. पण ज्याना राज्यसत्ता टिकवायची असते त्याना येवढी प्रखर राष्ट्रवादी भूमिका घेणे परवडत नसावे. ती भूमिका घेतली तर सौद्याची सोय जाते आणि 'फोडा आणि झोडा'चा साहेबी संस्कारही पार बुडवून टाकल्याचे महत्पाप (?) माथी येते असेही वाटत असावे. सौद्याच्या ह्याच भावनेतून मातृभूमीचे तुकडे केले गेले. त्याच भावनेतून "तिथे गवतही उगवत नाही. माणसे रहात नाहीत" अशी परिभाषा सुरू झाली. त्या भावनेतूनच भारताचे 'सेक्युलर' स्वरुप जगाच्या मनावर ठसविण्यासाठी म्हणून मुसलमान राष्ट्रपतीना निवडून द्या अशी विनंति 'सेक्युलर' इंदिराजी करू घजावतात. त्याच भावनेतून भारताचा मुख्य न्यायाधीश मुसलमान म्हणून निवडला जातो. कच्छचे ऐच्छिक दान घडते. मिलातच्या अधिवेशनात 'केंद्र सरकार नपुंसक आहे' असे उद्‌गार काढले गेले आणि पुरावा म्हणून गृहमंत्र्यांबद्दल काही निरर्गल उद्‌गार काढले गेले तरी तिकडे राज्य व केंद्र सरकार चक्क 'काणाडोळा' करू शकते. 'रस्त्यावर या' हे आव्हान दिले जाते आणि तसे आव्हान देणारी माणसे मुक्तच राहतात. आणि मग अवघ्या महिनाभरात जातीय दंग्यांची पुन्हा लाट पसरते. औरंगाबाद, नागपूर, गाझीपूरला दंगे होतात. कुठे औरंगाबाद तर कुठे नागपूर, काझीपूर – पण एकदम दंगे होतात. केरळात मुस्लिम लीग पुन्हा मोठ्या झेपा घेते तर उत्तर प्रदेशात 'मुशावरत' राजकीय रूप घेऊन 'इस्लाम खतरेमे' आहे म्हणत निवडणूक लढविण्याचा मनसुबा रचते. हजारो रुपये खर्चून केलेली शेख अब्दुल्लांची खुषामत वांझ ठरते. बोलणी होतात अधुन मधुन, पण वाया जातात. आमचे सदिच्छेचे फतवे केराच्या टोपलीत जातात.

हे सारे पूर्वी असेच घडले होते. त्यातून फाळणी झाली. आता पुन्हा त्याच इतिहासाची पुनरावृत्ती होऊ पाहते आहे. 'मुस्लिम अनुनय' सौदेबाजीसाठी पेरला. देशाचे खंडित स्वातंत्र्य फाळणीची लाच (व लालूच) देऊन विकत घेतले. अनेक निरपराध माणसांचे मूक बलिदान व हिंदूंचा वंशविच्छेद मख्खपणे पाहिला. आणि आता 'सेक्युलॅरिझम्'च्या कैफात नवे सौदे पटविण्याचा प्रयत्न चालू आहे. सर्वांना सारखा न्याय लावायचा आहे ना? मग लावा की ! मुस्लिम अनुनयाने दिलेले कठोर शासन इतक्यातच विसरलात ? भारतात, शिवाजीच्या महाराष्ट्रात भारताच्या शासनाला व गृहमंत्र्याना × × × × म्हणण्याची हिंमत होऊ शकते तर ! ह्याच गोष्टी तुम्ही पेरल्या. मातांच्या सौदेबाजीसाठी केरळात मुस्लिम लीगला जीवदान दिले. आता मतांचे मोल मागत मुसलमान सर्वत्र फिरत आहेत. मिलातच्या अधिवेशनातल्या निरर्गल वक्तव्यांबद्दल आम्ही काय ताठ भूमिका घेतली ? हा चव्हाण वा इंदिराजींचा वैयक्तिक अपमान आहे असे आम्ही मानीत नाही. हा आमच्या राज्यशासनाचा अपमान आहे. निधर्मित्वाला दाखवलेल्या ह्या प्रकट वाकुल्या आहेत. जाहीर गालिप्रदान आहे. आणि हे सारे जाणीवपूर्वक व संघटितरीत्या होत आहे. 'पाकिस्तान झिंदाबाद'चे नारे लगावीत शस्त्रे घेऊन हिंदुस्थानात माणसे रस्त्यावर येऊ शकतात. "हसके लिया पाकिस्तान – लढ़के लेंगे हिंदुस्थान" ही घोषणाही इथे 'सेक्युलर' भारतात उच्चारली जाऊ शकते. कारण इथे 'मुसलमान' ही सत्तेच्या सौद्यातली एक महत्वाची 'सोंगटी' आहे. तिचे 'दान' आपल्याला पडून 'यावच्चंद्र दिवाकरौ' सफेद सत्ता दिल्लीच्या गादीवर कायम रहावी म्हणून प्रयत्नशील रहावे लागते. म्हणूनच ह्या सौद्यातील स्वतःचे 'मोल' जाणून मुसलमान अधुनमधून 'पाकिस्तान झिंदाबाद'च्या 'मौलिक' घोषणा करीत असतात. ह्याबद्दल 'हिंदुस्थान अमर रहे' ही घोषणा पाकमध्ये कधी तरी गर्जेल काय ? स्वप्नात सुद्धा ऐसे घडणे नोहे. पण साऱ्या राष्ट्रीय भावना अस्मितांचा अपमान करणारी भयानक सौदेबाजी जोपर्यंत आम्ही फेकून देऊ शकत नाही तोपर्यंत हे असेच घडत राहणार आहे. आम्ही पाहणार आहोत. कारण इतिहासापासून मुळी काही काहीही शिकायचे नाही हा आमचा शतकांचा वारसा आहे. तो वारसा फेकून देणाऱ्या महापुरुषाचे आम्ही फक्त पुतळे उभारू. वर्षातून एकदा जयजयकार करू. आणि मग तो महान (करंटा) वारसा आम्ही चालवीत राहू.

सौदा पेरला आहे. औरंगाबाद, नागपूर, काश्मीर, गाझीपूर वगैरे ठिकाणी त्याची फळे बाहेर पडत आहेत. 'सौदा' संप्रदायाचा विजय असो !!

—सारस्वत

[ पान ५४ वरून—इंद्रधनुष्य ]

## कलाकारांचे सहकार्य

रंगमंचावर कोटला उभे राहिले ते केवळ वास्तव नेपथ्यामुळे नव्हे तर अनेक पात्रांच्या सराईत वावरण्यामुळेही ! तोंडाला रंग लावलेले नट रंगमंचावर अभिनय करीत नसून प्रत्यक्ष कोटला गावातील विविध पात्रेच आपल्या डोळ्यांपुढे उभी आहेत असा भास होत होता. अन् ही पात्रे संख्येने इतकी होती, की शमा झैदी आणि ओ. पी. कोहली या दिग्दर्शकद्वयीच्या कसबाचे कौतुक वाटल्याखेरीज राहात नाही. मंगलच्या भूमिकेत बलराज सहानी यांचे चिरंजीव परीक्षित यांचे हिंदी रंगमंचावर प्रथमच पदार्पण झालेले असावे; आपल्या वडिलांचा वारसा ते उत्तम प्रकारे चालवतील यात शंका नाही. राणोचा सासरा हुजूरसिंह याच्या भूमिकेत ए. के. हनगल यानी आपले अखेरचे भाषण इतके सुंदर म्हटले की सबंध नाटकाचा आशयच एका क्षणात एकवटून डोळ्यांसमोर उभा राहिला. नाटकातील घटनांचे सांधे जोडण्यासाठी वेदीसाहेबानी एका कथाकाराची योजना केलेली होती; 'एक चादर मैली सी'चे स्वरुप एखाद्या भित्तिचित्रासारखे आहे हे लक्षात घेतल्यास ती सार्थ वाटते.

या नाटकात दोन प्रसंग असे आहेत की जे सादर करणे थोडे धाडसाचे ठरते. एक रात्रीच्या वेळी सलामती नावाच्या आपल्या प्रेयसीला एकटे गाठून अंगावरचा खमीस उतरवायला लावतो तो, अन् दुसरा राणो मंगलला आपल्या मोहपाशात ओढते. तो रंगमंचावर या दोन्ही 'नाजुक' घटना सादर केल्या गेल्या त्या प्रत्ययकारीपणे, परंतु रूढ अभिरूचीच्या मर्यादा कल्पकपणे सांभाळून.

हे नाटक पाहिले अन् आजच उत्तमोत्तम मराठी नाटके मिळमिळीत, कृत्रिम वाटू लागली ! चाकोरीत पडल्यावेळी मनाला जाग आणणारे असे एखादे नाटक आपल्या देशाच्या मातीची आठवण करून देते, अपरिचित जीवनावर प्रखर प्रकाशझोत टाकून जाते, बराच काळ मनाला अस्वस्थ ठेवते.

● ● ●

# मृत्यूने गिळली माणके....

मृत्यूने अलिकडच्या काळात जगातली व महाराष्ट्रातली फार मोठमोठी माणसे अलगद उचलून नेली आहेत. सिनेटर **रॉबर्ट केनेडी, श्रीमति हेलेन कीलर, शिल्पकार पानसरे,** कॅ. **शंकरराव चाफेकर, दा. वा. पोतदार, भजनी सम्राट फुलाजीबुवा** ह्यांचा ह्याठिकाणी प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. ही सारी मंडळी त्यांच्या क्षेत्रात केवळ नामवंत होती असेच नव्हे तर अजोड होती. अद्वितीय होती. रॉबर्ट केनेडींबद्दल अन्यत्र लिहिले आहे. हेलेन कीलर ह्या स्त्रीने एक जागतिक विक्रम केला होता. प्रतिकूल ते सर्व तिच्या वाटयाला आले होते. पण **'केल्याने होत आहे रे'** पंथाची ती स्त्री असल्याने अंधत्व व बहिरेपणा यावर तिने नुसतीच मात केली नाही, तर जगातल्या अनेक अंध व बहिऱ्यांसाठी एक मोठा दिलासा उत्पन्न करून ठेवला आहे. नुसतेच जीवन उपभोगता येत नाही तर आनंदाने जगता येते आणि इतरांनाही आनंदाने जगविता येते ह्या संदेशाचे उत्तम उदाहरण म्हणजे कीलर बाई ! त्या जगभर हिंडल्या, त्यांनी ग्रंथनिर्मिती केली, अंधांसाठी परिभाषा तयार केली आणि 'घायलकी गति घायल जाने' ह्या न्यायाने आयुष्यभर अंध व बहिऱ्यांच्या कार्यासाठी त्या झटल्या.

शिल्पकार नारायण गणेश पानसरे हे नाव शिवाजीपार्कवरील आशियातील सर्वात मोठ्या गणल्या गेलेल्या शिवाजीच्या पुतळ्यामुळे अवघ्या महाराष्ट्राला सुपरिचित झाले असले तरी महाराष्ट्रात जे अग्रगण्य शिल्पकार आहेत, त्यात त्यांचा समावेश होत असे. जे. जे. स्कूल ऑफ आर्टच्या परीक्षेत त्यांनी प्रथम क्रमांक पटकावून अनेक बक्षिसे, पदके व शिष्यवृत्त्याही संपादन केल्या होत्या. १९३७ त ते इंग्लंडला गेले व १९४० साली शिल्पकलेतील पदवी संपादन करून परत आले. अनेक खाजगी व सार्वजनिक इमारतींच्या शिल्पाचे काम त्यांनी केले. फिल्म फेअर अॅवॉर्ड, महाराष्ट्र शासनाचे मराठी चित्रपटाचे अॅवॉर्ड, आदींचे शिल्प-नमुने त्यांनी केले होते. शिवाजीपार्कचा २२ फूट उंच व २६ फूट रुंद पुतळा हे त्यांचे अखेरचे भव्य व नेत्रदीपक काम. त्यात त्यांना खूप ताण पडला व मनस्तापही झाला असे ऐकतो. ह्या साऱ्यातून सावरण्याची कसोशीची खटपट चाल असतानाच मृत्यूने त्यांना अलगद उचलून नेले आहे.

युद्धशास्त्राचे व्यासंगी टीकाकार व पुण्याचे माजी महापौर मेजर शंकरराव चाफेकर असेच अचानक हृदयविकारानेच गेले. अवघ्या पंधरा मिनिटात सारा खेळ खलास झाला. मेजर चाफेकर ह्यांनी पदवी संपादनानंतर सैन्यात प्रवेश केला आणि दुसऱ्या जागतिक महायुद्धात त्यांनी सिंगापूर, मलायातील लढाईत प्रत्यक्ष भाग घेतला. ते साडेतीन वर्षे जपानचे युद्धकैदीही होते. युद्धातून परतल्यावर त्यांनी पुण्याच्या अनेक सार्वजनिक कामात भाग घेतला. व पुण्याचे उपमहापौरपदही भूषविले. बंदुकीप्रमाणेच त्यांनी कुशलतेने लेखणीही हाताळली. युद्धसंरक्षण व अन्य लष्करी विषयावरील त्यांची ग्रंथरचना खूप गाजली. जागतिक कीर्तीच्या जनरल पर्सीव्हल व कॅप्टन लिडेल हार्ट ह्या जगविख्यात युद्ध टीकाकारांनीही त्यांच्या मलाया-इटालीतील युद्धविषयक टीकाग्रंथाची प्रशंसा केली होती. त्यांनी केसरी, महाराष्ट्र टाइम्समधून अलिकडे युद्धविषयक खूप लेखन केले व युद्धशास्त्रात सामान्य माणसाला रस घ्यायला शिकविले. भारत-पाक युद्धाचे वेळी नागरी संरक्षणाचे दायित्व त्यांच्यावरच होते. त्यांनी केलेले मार्गदर्शन महत्वपूर्ण ठरले. बंदूक, लेखणी व प्रत्यक्ष जनसेवा ह्यांचा सुंदर मिलाफ म्हणजेच मेजर शंकरराव चाफेकर !

## कै. रत्नाकर देसाई



**साहित्य आणि कला या क्षेत्रातील निवडक व्यक्तींच्या निधनाची साथच आली आहे की काय असे श्री. रत्नाकर अनंत देसाई यांच्या नुकत्याच झालेल्या निधनामुळे म्हणावेसे वाटते. गोमंतकाचे एक कर्तृत्ववान सुपुत्र आणि अल्पावधीतच लोकप्रिय झालेल्या 'राजश्री' मासिकाचे जिद्दी संपादक श्री. देसाई हे नुकतेच कालवश झाले हे नमूद करण्यास आम्हास अत्यंत दुःख होत आहे. 'राजश्री' मासिकाचा व्यवस्थित जम बसल्यानंतर त्यानी खास महिलांसाठी 'कुलवधू' नावाचे मासिक प्रकाशित करण्याचा संकल्प जाहीर केला आणि त्या मासिकाची प्राथमिक जुळवाजुळवही केली होती. पण त्यांचा संकल्प पूर्ण होण्याआधीच निर्घृण काळाने त्याना आपणातून ओढून नेले आहे. कै. देसाई यांचे कुटुंबिय, आप्तेष्ट आणि त्यांचे असंख्य रसिक चाहते यांच्या दुःखात आम्ही सहभागी आहोत. त्यांच्या आत्म्याला सद्गती लाभो हीच प्रार्थना !**

**—संपादक**

दत्तो वामनांची काठी गेली ! त्यांचे धाकटे बंधु श्री. दामोदरपंत हेही असेच अचानक गेले. आनंदापाठोपाठ दुःख त्या घरी चालतच गेले. ती चाल मात्र कुणालाच कळली नाही. दामुअण्णा गेले हे कुणाला कळले नाही आणि कळले तेव्हा खरे वाटले नाही. पण ते घडले. औद्योगिक क्षेत्रात, सहकाराच्या क्षेत्रात, अत्यंत निर्धाराने, धडाडीने व कुशलतेने काम करणारात त्यांचा समावेश होत असे. अनेक संस्थांशी त्यांचा परिचय आला – संबंध जडला. त्यांच्या निडर वृत्तीने, पण तितक्याच स्वभावाच्या गोडव्याने, स्नेहशील वर्तनाने

ते साऱ्याना हवेसे वाटत असत. 'दत्तो वामन' इतिहासतज्ञ तर हे उद्योगपति. पण श्रद्धा रामलक्ष्मणाची ! 'माझी काठी गेली' असे दत्तो वामन कळवळून म्हणाले ते ह्याच अर्थाने असावे. दामुअण्णा पोतदार हेही भावाप्रमाणे अत्यंत मिश्किल, विनोदी स्वभावाचे होते. ते चांगल्या नकला करीत असत. स्वभावाने फार ऋजु होते, तितकेच स्वतःच्या मतांबाबत आग्रही, प्रसंगी कठोरही होणारे असे होते. त्याबाबतीत संकोच, भीड अशी त्यांनी कधी मानली नाही. पण ह्या त्यांच्या वागण्यातून वैयक्तिक शत्रुत्वाला मात्र त्यांनी कधी थारा दिला नाही. मतभेद म्हणजे शत्रुत्व नव्हे असे हेही मानीत आणि आपल्या वागण्याने त्याचा इतरांनाही प्रत्यय देत. सहकार आणि उद्योग ह्या क्षेत्रातली एक स्नेहशील व मार्गदर्शक शक्ति नाहीशी झाली आहे असेच म्हटले पाहिजे.

भजनी परंपरेतले एक श्रेष्ठ गायक श्री. **फुलाजीबुवा नांगरे** हे २६ मे १९६८ ला निधन पावले. त्यांचा मृत्यु मात्र वरीलप्रमाणे अचानक घडला नाही. गेले वर्षभर ते मधुमेह व हृदयविकाराने आजारीच होते. फुलाजीबुवा म्हणजे कलदार रुपया. खणखण वाजायचा. त्याचा 'बद्द' असा आवाज कधी झालाच नाही. आणि हा खणखणीत रुपया सतत चाळीस-पंचेचाळीस वर्षे आपला आवाज राखून होता. 'रामराज्य' ह्या हिंदी व मराठी चित्रपटात त्यांनी पार्श्वगायन केले तर संत सखु, जमुना आदि चित्रपटात त्यांच्या भूमिकाही होत्या. भजनी गायकीने त्यांनी त्या सजवल्या. मोठ्या केल्या. मूकपटाच्या जमान्यात पडद्यावरील चित्रांना प्रत्यक्ष असे वाद्यसंगीत साथीला असे. फुलाजीबुवा स्वस्तिक (पंधे) व नॉव्हेल्टी चित्रपटगृहात बाहेर बसून पेटीची साथ करीत असत. फुलाजीबुवांच्या मृत्यूने त्या क्षेत्रातला एक ज्येष्ठ व श्रेष्ठ कलाकार आपल्यातून गेला आहे.

ह्या साऱ्या मंडळींना 'दीपावली' ची श्रद्धांजलि. ईश्वर मृतात्म्यास शांति देवो.

**—संपादक**

## कै. गोपाळकृष्ण भोबे स्मारक निधी

**वरील स्मारक निधीसाठी आलेल्या देणग्यांची यादी या अंकात प्रसिद्ध करण्याचा इरादा होता. परंतु गोव्यातून व महाराष्ट्रातील भोबे प्रेमिकांकडून निधीसाठी आश्वासने व रकमा येत असल्याने त्या सर्व देणगीदारांची संपूर्ण यादी 'दीपावली'च्या पुढील अंकी करण्यात येईल. महाराष्ट्र व प्रामुख्याने गोवा येथून ज्यांनी ज्यांनी ह्या कार्यास सक्रिय हातभार लावला त्या साऱ्यांची समिती ऋणी आहे.**

[पृष्ठ १० वरून—शल्य]

दुसऱ्या वाहनांची वर्दळ त्यावेळी तेथे नसल्यामुळे कोणाचीही नजर पडण्यापूर्वीच मला धूम ठोकता आली. मी भेकडासारखा वागलो खरं. त्याची मला खंत वाटते. पण, विचार केला. . . पकडला गेलो असतो तर निदान सहा महिने सक्तमजुरीची शिक्षा मला झाली असती. मी फटफटी बेदरकारपणे चालविली होती नि शिवाय ड्रायव्हिंगचे लायसेन्सही मी कधी काढले नव्हते. . कायद्याप्रमाणं घायाळ झालेल्या माणसाच्या औषधपाण्याची देखील तजवीज केली नव्हती. मी ट्रीवल गुन्हे केले होते. वरं, पारूला नुकसानभरपाई देऊन सुटका करून घ्यावी असं वाटलं तरी दरमहा जेमतेम तीनशे साडेतीनशे प्राप्ती असलेल्या माझ्यासारख्याला जमलं असतं का ? आणखीन् त्याशिवाय, त्याक्षणी झोपडपट्टीतल्या अडाण्यांनी मला मारपीट करून जीवंत ठेवलं असतं का?"

"हो, तेही खरंच. अपघात झाला म्हणजे ड्रायव्हरची चूक असो वा नसो, पब्लीक त्याला झोडपतय् हे मात्र माझ्या डोळ्यानं पाहिलय् मी. परवाच एका भैय्याला त्याच्या टॅक्सीनं एका कामगाराला धडक दिली म्हणून लोकानी असा बुकलून काढलाय म्हणता, जसा काही पाकीटमारच !" तात्यांनी स्वानुभव सांगितला.

"काय हो, पण त्या लंगडीला पुढे अपघातानंतर कसं ओळखलं? आणि पोलिसानीही तुम्हाला कसं पकडलं नाही ?".... दुसऱ्या पेन्शनराने भुवया विस्फारून सवालांची सरबत्ती सुरू केली.

"पोलिसानी गुन्हा रजिस्टर केला होता. झोपडपट्टीतील कित्येक साक्षीदारांच्या जबान्या घेतल्या होत्या. पण फटफटीचा नंबर अगर आरोपीसंबंधी म्हणजे माझ्यासंबंधी काहीही माहिती कोणाकडूनही न मिळाल्याने प्रकरण फाईल करण्यात आले. अपघातात घायाळ झालेल्या पारूला पोलिसानी पोद्दार हॉस्पिटलात ॲडमीट केले होते. झोपडपट्टीवाल्यांची 'केस' म्हणून पोलिसांनी आस्थेने नि कसोशीने गुन्हेगार शोधण्याचे टाळले असावे. त्रयस्थाची भूमिका घेऊन मी सर्व माहिती मिळविली होती. तिचा डावा पाय गुडघ्यापासून खालपर्यंत कापून काढावा लागला. पारु महालक्ष्मीच्या एका फॅक्टरीत काम करीत होती. रोजी दोन रुपये मिळवीत होती. पण लंगडी झाल्यामुळं तिची नोकरी सुटली होती नि नाईलाज म्हणून भीक मागत होती. तिचा कापून टाकलेला पाय का मी मिळवून देणार होतो ? माझ्या मनाला सतत टोचणी लागली होती. मनाला शांती मिळावी म्हणून मी येथे दररोज माझ्यापरीने तिला पैसे देत होतो— दानधर्म म्हणून नव्हे तर मन हलकं व्हावं म्हणून . . . . . "

"सुटली विचारी ! तसंच तुमच्याबद्दलचं आमचं कोडंदेखील सुटलं" तात्या म्हणाले.

शरमिंदा होवून मी पेन्शनर—मंडळीच्या बैठकीतून धूम पळत सुटलो. . . . अपघात करून फटफटीवरून जीव घेवून पळालो होतो तसा ! खोलीत प्रवेशताच मी कपाळावरचा घाम निरपला अन् पिशवीतलं ते मोरपंखी लुगडं भुईवर फेकून दिलं. त्या मोरपंखावरचे डोळे वटारले होते. बुब्बुळं ठिणग्या ओकत होती. त्या बुब्बळात मला पारु दिसत होती. तिच्या बुडाखालचं टायरचं रबर माझ्या कानात कर्र... कर्र... वाजत होतं. ●●●

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JULY 1968





Cover Printed At Asha Printery, Bombay-4

अनुक्रमणिका